रजपुतांमध्यें राखीची (रक्षाबंधनाची) चाल मोठी व सन्मान्य आहे. एकदां एखाद्यास ही राखी पाठविली ह्मणजे तो आपला भाऊ झाला असें समजतात. राखी पाठविणें ती स्त्रिया पुरुषांस पाठवितात व तिच्या योगानें त्या बंधुभगिनींचें नातें जोडितात. अशी एखादीकडून राखी आली ह्मणजे तिला उलट कांचोळी दिली पाहिजे व हेंच तेव्हांपासून बंधुभगिनींचें बंधन होतें असें ते समजतात. रजपुतस्थानांत असणाऱ्या रेसिडेंटास व पोलिटिकल् एजंटास देखील ह्याप्रमाणें राजघराण्यांतल्या स्त्रिया राखी पाठवून त्याला आपल्या बंधुवर्गांत आणतात. याचें कारण इतकेंच कीं, त्यानें आपल्या घराण्यास कोणताही उपद्रव किंवा त्रास देऊं नये.

रजपूत लोकांत, एका ताटामध्यें जेवणें हें विशेष महत्वाचें, प्रीतीचें आणि सलगीचें समजतात. परंतु वाटेल त्यास हा एकपात्रभोजनाचा मान मिळत नाहीं. त्यांच्या जातीचा असून, तो मान देण्याला पात्र असेल त्याशींच ते हा सलगीचा व मैत्रीचा विधि करितात. हलकट, जारज व अधम अशा लोकांस हा मान कदापि मिळावयाचा नाहीं. रजपुतांमध्यें दुसरी अशी एक चाल आहे कीं, कोणी राजा मेला तर लागलीच त्याचे मागून दुसरा राजा गादीवर बसविण्याचा उत्सव सुरू होतो. मयत राजाचें सुतक त्याचे वंशज न धरितां त्यांचे उपाध्याय अथवा पुरोहित असतात ते धरितात. आणि मृताचें शव पडलें असतांनाच नाच, रंग, तमाशे, विडे, पानसुपारी वगैरे राज्याभिषेकाचे उत्सव सुरू करितात. रजपुतांमध्यें शिकारी वगैरेकरितां निघण्यासही मुहूर्त बघावा लागतो. व त्या मुहूर्तावर शिकार वगैरे संपडून हेतु पूर्ण झाला तर तें वर्ष चांगलें जाईल असें ते समजतात. [१]त्यांजमध्यें निरनिराळ्या कुळांचीं निरनिराळीं दैवतं आहेत हें पूर्वी एका ठिकाणीं सांगितलेंच आहे. त्या देवतांचींच नांवें त्यांच्या शिक्क्यांत आणि कागदपत्रांत त्यांची निशाणी ह्मणून घातलेलीं असतात.

येथपर्यंत राजस्थान व उत्तरहिंदुस्थान यांमध्यें असणाऱ्या क्षत्रिय व रजपूत लोकांचे संबंधानें माहिती लिहिली. याच क्षत्रियांचे व रजपुतांचे वंश दक्षिणेकडे व गुजराथेंत वसाहतीकरितां गेले. ते तिकडे मराठे व परभू आणि गिरांशी व ठाकूर या जातींनीं अनुक्रमें दक्षिण व गुजराथ या प्रांतांत प्रसिद्ध आहेत. क्षत्रियांच्या ज्या शहाण्णव कुळी आहेत त्यांतीलच दक्षिणेकडे पंवार ऊर्फ प्रमार, जाधव ऊर्फ यादव, घोरपडे ऊर्फ भोंसले किंवा सिसोदे, शिरके ऊर्फ तुवर, मोहिते उर्फ चव्हाण, गुजर ऊर्फ पंवार, खानवेलकर ऊर्फ राणे, साळुंखे, मोरे,

---

१. याविषयींची तपसीलवार माहिती बघावयाची असल्यास लोकहितवादीकृत 'स्वाध्याय' नामक पुस्तकांत सांपडेल.

गौळी वगैरे वंशांतले लोक फार पूर्वीं येऊन राहिले. यांत कोणी शालिवाहनाचे, कोणी विक्रमाचे व कोणी पृथ्वीराजाचे भाऊबंद आहेत. हे सर्व, कोणी बिंबराजाबरोबर, कोणी मुसलमानांचे गर्दीत व राज्यक्रांतींत आपलें रक्षण करण्याकरितां, कोणी नवा मुलूख घेण्याकरितां व कोणी काळ व लढायांचे संबंधानें दक्षिणेंत व गुजराथेंत उतरले. दक्षिणेंत जे इनामदार पाटील व देशमुख वगैरे आहेत ते मराठे आणि जे रयताव्यानें जमिनी करितात व सरकारास सारा भरतात ते कुळंबी, असे एकाच जातींत दोन भेद असून ते दोघेही उत्तरेकडील क्षत्रियांच्याच शाखा आहेत. गुजराथेंतील या क्षत्रिय शाखेंत गिराशी व खेडू हे मुख्य असून गिराशी हे वर लिहिलेल्या दक्षिणेंतील पाटील, इनामदार, देशमुख वगैरे सारखेच विनधाऱ्यानें जमिनी भोगणारे असून, खेडू हे आपल्या इकडील साऱ्यानें शेतें वाहणाऱ्या कुळंब्यांप्रमाणेंच सारा भरून शेतें करणारे आहेत. ह्याप्रमाणें दक्षिणेकडे उतरलेल्या क्षत्रियांचा व त्यांच्या नामांतराचा इतिहास आहे. हे सर्व क्षत्रिय दक्षिणेकडे ठायीं ठायीं आपलीं लहान लहान राज्यें करीत होते. परंतु त्या सर्वांचा मुसलमानी गर्दीत फडशा उडून, देवगिरी, वरंगूळ, विजयनगर, तगर, प्रतिष्ठान, कल्याणी वगैरे त्यांचीं राजधानीचीं शहरें व नगरें नष्ट झालीं आणि त्यांचे जागीं गोवळकोंडें, बऱ्हाणपूर, विजापूर, बेदर, हैदराबाद, अहमदनगर वगैरे मुसलमानी बादशाहींच्या राजधान्या झाल्या. परंतु हल्लीं तर त्याही पडीत होऊन इंग्रजी अधिकाऱ्यांच्या व व्यापाऱ्यांच्या सोईप्रमाणें मुंबई, मद्रास, कलकत्ता, मालकमपेंठ, जाकोबाबाद वगैरे निरनिराळीं शहरें वसून तीं भरभराटीस येत आहेत. त्याचप्रमाणें जुने मार्ग, रस्ते व वाटा वगैरे बंद पडून नवे सोईचे मार्ग, सडका, पूल, आगगाड्या वगैरे सुरू झालीं आहेत. सारांश, एकच काळ, एकच वस्ती व एकच कारकीर्द चिरकाळ न रहातां, या सृष्टिक्रमांत दिवसानुदिवस अनेक फेरफार होऊन, अनेक गोष्टी घडून आणि अनेक शोध तपास होऊन इतिहासाचा भाग कालाबरोबरच वाढत आहे. त्यांचा लाभ आपण ज्ञानवान् मनुष्यप्राण्यांनीं जर नाहीं घेतला तर आपल्या ज्ञानवत्तेचें चीज आपण केलें नाहीं असा दोषारोप आपल्या कपाळीं आल्याशिवाय राहणार नाहीं !

# उदेपूरचा इतिहास.



## भाग पहिला.

### उदेपूरच्या राजघराण्याची हकीकत.

उदेपूरचें राजघराणें.—त्याचा राज्यविस्तार व त्यास राणा हें पद.—उदेपूरचा इतिहास काढण्यास साधनें.—उदेपूरच्या राजघराण्याची मूळची हकीकत.—विजयनगर वगैरेंची रचना.—शिलादित्य व त्याचा पुत्र गुह.—गेहलोट वंशाचा ऱ्हास व बाप्पा रावळाचा जन्म.—एकलिंगजीचें स्थान.—नाथद्वारा व श्रीनाथजीचे संस्थान.—बाप्याचे पुढील वृत्त.—बाप्पाचा विजय.—बाप्पाचा शेवट.—बाप्पाच्या पुढील राजे.—उदेपूरच्या राणेवंशाशीं मुसलमानांचा मानलेला संबंध.

ज्या प्रांतीं उदेपूर आहे त्या प्रांतास 'मेवाड' ह्मणतात व तेथील राजास 'राणा' ह्मणतात. उदेपूरच्या राण्याचें घराणें सूर्यवंशांत वडील असून त्यास रघुवंशांतही गणतात. या वंशाला 'हिंदुवा सूरज' ह्मणजे 'हिंदूंचा सूर्य' असें ह्मणतात. क्षत्रियांचीं जीं छत्तीस कुलें आहेत त्यांत उदेपूरच्या राण्याचें कुल हें पहिलें आहे.

हिंदुस्थानांत मुसलमानांचा दंगा सुमारें १००० वर्षे चालला; परंतु माहमूद गिजनवी हा सिंधुनदी–जीस मिह्नामहिरावण किंवा नीलाब ह्मणतात ती–उतरून हिंदुस्थानावर आला, त्या काळीं जेवढें उदेपूरचें राज्य होतें तितकेंच आतांही आहे. उदेपूरच्या राजांचा बहुत काळापासून असा अभिमान आहे कीं, आह्मी मानवी वंशापैकीं नसून आमचा दैवीवंश–ह्मणजे सूर्यनारायणापासून–आहे. उदेपूरच्या राजाला पूर्वी 'रावळ' हें नांव होतें. पुढें इसवी सनाच्या तेराव्या शतकामध्यें त्यांनीं परिहार वंशाकडून मंदावरचें राज्य काबीज केलें व तेव्हांपासून त्यांनीं आपणास 'राणा' हें पद घेतलें.

उदेपूरच्या राज्याचा इतिहास काढण्यास बहुत साधनें आहेत. राजा जयसिंग यानें 'खुमान रासा' ह्मणून एक राजावळी लिहिलेली आहे. तसेंच 'राजरत्नाकर,' 'जयविलास,' 'अकबरनामा,' 'बाबरनामा,' 'जहानगिरी तवारीख' वगैरे ग्रंथ आणि सनदा, पत्रें, भाटांचे लेख व भाटांनीं लिहिलेल्या ब्रीदावळी वगैरे पुष्कळ साधनें असून त्यांवरून उदेपूरचा इतिहास निघतो.

या इतिहासावरून असें समजतें कीं, कौसल्यापुत्र रामचंद्र अयोध्याधिपति असून त्याचे जे लहु आणि कुश असे दोन पुत्र होते, त्यांतील लहु यानें लाहोर शहर

वसविलें. आणि त्यावरूनच लाहोरास 'लहुकोट' असें नांव प्रसिद्ध होतें. लहूचे पुढें चौपन्नावे पिढीस सुमित्र ह्मणून राजा झाला. या सुमित्राला समकालीन असा उज्जनीस विक्रमादित्य हा राजा होता. सुमित्राचे पुढें नवव्या पिढींत कनकसेन नांवाचा राजा झाला. तो इ० स० १४४ त सौराष्ट्र देशांत येऊन राहिला असें अंभेर येथील राजा जयसिंग यानें लिहून ठेविलें आहे. हा जयसिंग ह्मणजे मोठा ज्योतिषी असून त्याला इतिहास लिहून ठेवण्याची फार हौस असे. तेव्हां त्याचे लेखांतील प्रमाण विशेष विश्वसनीय मानिलें पाहिजे. ह्या राजाचें अंभेर शहर, ह्मणजे जयपूर शहर वसविण्यापूर्वी जी त्याची राजधानी होती तें, हें जयपुराजवळच आहे. असु. कनकसेनानें सौराष्ट्रांत वसती केल्यावर त्याचे वंशास पुढें 'सेन' असेंच ह्मणूं लागले. त्यानंतर त्याच वंशास 'आदित्य,' पुढें 'सूर्यवंशी' व पुढें 'गेहलोट' असें ह्मणूं लागले. हें गेहलोट नांव घेतल्यावर ते उदेपूरच्या डोंगरांतील एका खोऱ्यांत येऊन राहिले. त्या खोऱ्याचें नांव 'आहार्य' असून तेंच नांव या गेहलोटांनीं आपल्यास घेतलें. याप्रमाणें त्या वंशाच्या मूळ नांवांत बरेच फेरफार होत आले. पुढें या वंशास 'सिसोदिया' असें नांव पडलें व तेंच अजून चालत आहे. या नांवाच्या उत्पत्तीची दंतकथा कांहीं चमत्कारिक आहे. ती अशी कीं, एके वेळीं या आहार्य वंशाचा पुरुष वनांत शिकारीस गेला असतां मोठाल्या सावजांच्या शिकारी मारून आणावयाच्या तों त्या दिवशीं त्यास फक्त एक ससा मात्र मिळाला. त्यावरून त्यास सिसोदिया हें नांव मिळालें व तेंच पुढें त्याचे वंशास चाललें. त्या वेळीं तें कुळ चितोडास होतें. पुढें सिसोदिया हें कुल उदेपुरास आलें. त्या वेळीं त्यास 'राणावट' असें नांव पडलें होतें. सिसोदिया चितोडास असतांना मुसलमानांनीं तीन वेळ चितोडावर स्वाऱ्या केल्या होत्या. परंतु त्या शूर लोकांनीं त्या तिन्ही वेळीं त्यांचा पराभव करून चितोडच्या किल्ल्याचें संरक्षण केलें होतें.

कनकसेन हा लहूचा वंशीय असून, लहूचें राज्य लाहोर येथें असल्याविषयीं प्रथमतःच लिहिलें आहे. ह्मणजे, कनकसेन हा मूळचा पंजाब प्रांतांतला असून, तो तेथून गुजराथेंत उतरला; व तेथें त्यानें प्रमार राजाचें राज्य घेऊन इ० स० १४४ मध्यें वडनगर वसविलें. कनकसेनाचे पुढें चौथ्या पिढींत विजयसेन ह्मणून पुरुष झाला, त्यानें विजयपुर व विदर्भनगर अशीं दोन शहरें वसविलीं. पैकीं विजयपुर हें धोळक्याजवळ आहे व विदर्भनगरास सिहोर असें हल्लीं नांव आहे. वरील दोन नगरें वसविल्यावर विजयसेनानेंच, भावनगरापासून पांच कोसांवर वळा ह्मणून जें हल्लीं गांव आहे तेथें, वल्लभीपुर नांवाचें एक तिसरें नगर वसविलें होतें. परंतु पुढें तें मोडलें. त्यामुळें त्या नगराचा नांवाशिवाय कोठेंही शोध लागत न-

व्हता. या जयावर अशीं कांहीं कृत्यें होऊन जातात कीं, कालांतरानें तीं नाममात्रावशेष राहून त्यांच्या स्थितीची व स्थलाची कांहींएक खूण राहात नाहीं! त्याचप्रमाणें या वल्लभीपुराची स्थिति झाली. कीं, तें कोठें वसलें होतें याचा कोणास मागमूसही लागत नव्हता. परंतु आलीकडे पालिठाण्याजवळील शत्रुंज पर्वताचें माहात्म्य प्रसिद्ध झालें आहे त्याजवरून हें नगर वरील ठिकाणीं होतें असा तपास लागतो. हें वल्लभीपुर इ० स० ५२४ सालापर्यंत अस्तित्वांत होतें असा तपास लागतो व त्याच सालीं त्या शहरावर म्लेंच्छांनीं हल्ला केला; त्या गर्दींत त्याचा सर्वांशानीं नाश होऊन तेथील वस्ती उठून गेली, असे लेख सांपडतात. वल्लभीपुराचे आलीकडील प्रदेशास भालप्रांत ह्मणत. त्यांत क्षत्रियांची वसती फार असून ते आपणास सूर्यवंशी ह्मणवीत व त्यावरूनच त्या भालप्रांतास सौराष्ट्र (सौर+राष्ट्र) असें नांव पडलें असावें असें दिसतें. या सौराष्ट्रांतच शमीनगर नांवाच्या शहरीं यदुवंशीय राजे राज्य करीत होते असा दाखला सांपडतो.

वर वल्लभीपुराची वाताहत झालेली लिहिली. ही वाताहत ज्या म्लेंच्छांनीं केली, ते उत्तरेकडून खालीं उतरले होते व त्या वेळीं वल्लभीपुरास शिलादित्य राजा राज्य करीत होता, व तो त्या म्लेंच्छांच्या गर्दींत सकुटुंब मारला गेला. परंतु त्याचे बायकांपैकीं एक चंद्रावतीची राजकन्या पुष्पवती नांवाची जी बायको होती ती, त्या वेळीं अंबाजीस गेली होती. ती तिकडे असतांच इकडे राजकुळाचा समूळ नाश झाला. पुढें तिला हें अनर्थापाताचें वर्तमान कळलें. परंतु ती पूर्ण मासांची गरोदर असल्यामुळें ती तशीच काठेवाडांतील माळिया डोंगरांत आपल्या व गर्भाचा बचाव होण्याकरितां गेली. पुढें अशा दैवदुर्विलासांत असतांच ती प्रसूत होऊन तिला पुत्र झाला. नंतर तो पुत्र तिनें वडनगरच्या एका ब्राह्मणापाशीं ठेविला आणि आपण सती गेली. ब्राह्मणाकडे मुलगा आल्यावर त्यानें त्याचें चांगल्या रीतीनें संगो-

१. हिंदुस्थानांतून प्रवास करणारांस ठिकठिकाणीं अनेक प्राचीन शहरें आढळतात:—उज्जनी, धारानगरी, वळा, चंपावती, झिंझुवाडा, अयोध्या, कनोज, वेळापुर (पंढरपुराजवळ) वगैरे. वेळापुराजवळच एक चक्रपुर ह्मणून शहर होतें व महीचे कांठीं मयूरध्वजनगरी, खंबाइताजवळ ताम्रध्वजनगरी वगैरे स्थळें होतीं असें ह्मणतात. सारांश, राहतात तीं पूर्ववैभवशून्य नगरें राहतात; नाहीं तेथें मुळींच पत्ताही राहत नाहीं.

२. भाल हें नांव गुजराथेचे पश्चिमेस काठेवाडाचे आलीकडील प्रांतास आहे. हीं प्राचीन नांवें पाहावयाचीं असल्यास—पाळ, कानम, चुंवाळ, चरोत्तर, ढेंढार, गोहिलवाड, मच्छुकांठा अशीं अनेक आहेत. दक्षिणेंत जशीं बालेघांट, गंगथडी, मावळ, मानदेश, वगैरे प्रांतांचीं नांवें आहेत तशींच वरील स्थळें आहेत.

३. हें देवीचें स्थान अबूच्या पाहाडाजवळ असून तें हल्लीं दत्तियाच्या ठाकुराचे कबजांत आहे.

पन केलें. त्या ब्राह्मणाचे बायकोनें तो डोंगरांत जन्मला ह्मणून त्याचें नांव गुह असें ठेविलें. गुह हा जरी ब्राह्मणाचे जवळ खाऊन पिऊन वाढला होता तरी, तो जसजसा वयांत येत चालला तसतसे क्षत्रियाचे गुण दाखवूं लागला. ज्या अर्थी तो क्षात्रबीजाचा होता त्या अर्थी त्याजमध्यें ह्याप्रमाणें क्षात्रतेज चमकूं लागलें ह्यांत आश्चर्य नव्हतें. गुहानें शिकारी व पारधीकरितां भिल्ल लोकांच्या टोळ्यांतून फिरावें. या भिल्लांस त्या वेळीं वनपुत्र किंवा अरण्यपुत्र असें ह्मणत. त्या वनपुत्रांचें ईडर येथें एक स्वतंत्र राज्य होतें. त्या राज्यावर कोणाला बसवावें याविषयीं त्या वेळीं विचार चालला असून, कोणाला हें राज्यपद द्यावें याबद्दल त्यांनीं चिठ्या टाकून पाहिल्या. त्यांत गुहाचेंच नांव आल्यावरून व त्याजवर सर्वांचें प्रेम असल्यावरून त्याला त्या भिल्लांनीं आपला राजा केलें. ही गोष्ट प्रसिद्ध मुसलमानी इतिहासलेखक अबुल फझल यानेंही लिहिली असून भाटांच्या कवितांतून तर ती नेहमीं गाइली जाते. चिठ्यांमध्यें गुहाचें नांव निघाल्याबरोबर त्याजवर प्रेम करणाऱ्या भिल्लांतील एका तरुण भिल्लानें आपली करंगळी कापून त्या रक्ताचा गुहाचे कपाळीं टिका लाविला व 'आजपासून हा आपला राजा झाला' असें मोठ्यानें ओरडून सांगितलें. त्या भिल्लांची ही चाल होती कीं, जो आपला राजा होईल त्याचे कपाळीं भिल्लाचे रक्ताचा टिळा लावावा. त्याप्रमाणें त्यांनीं करून वर लिहिल्याप्रमाणें त्याला आपला राजा केलें. व त्याला जुन्या व वृद्ध भिल्लांनींही मान्य केलें. ह्याप्रमाणें गुह हा ईडरच्या भिल्लांचा राजा झाला. पुढें गुहाचे जे वंशज झाले त्यांस गुहलोट असें नांव पडलें. व त्या नांवाचा अपभ्रंश होऊन गुहलोट याचें गेहलोट असें रूप झालें; आणि गेहलोट ह्या नांवानेंच त्या वंशाची पुढें प्रसिद्धि झाली.

हा गेहलोट वंश ईडरच्या गादीवर सात पिढ्यांपर्यंत राज्य करीत होता. परंतु पुढें तेथील भिल्लांस हें परक्याच्या हातानें राज्य चालविणें बरोबर न वाटून त्यांनीं गेहलोटांचा सातवा पुरुष ग्रहादित्य ह्मणून राज्य करीत असतां, त्याचे राज्यांत दंगा करून त्यास मारून टाकिलें व गेहलोट वंशास ईडर येथून हांकून लाविलें. या ग्रहादित्याला बाप्पा ह्मणून तीन वर्षांचा मुलगा होता. त्याचें वडनगरच्या एका ब्राह्मणानें रक्षण केलें; व तो मोठा झाल्यावर त्यास भंडेरीगडावर नेऊन ठेविलें व तेथेंच तो वाढला. या भंडेरीगडावर त्याचा संरक्षक यदुवंशीय कोणी मनुष्य होता. पुढें तेथूनही त्याला काढून पाराशर अरण्यांत विशेष सुस्थळीं नेऊन ठेविलें.

---

१. गुह यास राजावळीत ग्रहादित्य असें ह्मटलें आहे. 'राजावलि २' पुरुषक्रम ७३ पहा.

याच अरण्यांत त्रिकूटाचल नांवाचा पर्वत असून त्याचे पायथ्याशीं नागेंद्र नांवाचें एक शहर असे. हें शहर अजून नागडा नांवानें पवित्र क्षेत्र ह्मणून उदेपुरापासून सुमारें पांच कोशांवर प्रसिद्ध आहे. या नागेंद्र शहरांत एक महादेवाचें स्थान असून त्या शहरच्या ब्राह्मणांचें तें मोठें पूज्य दैवत आहे. ह्या महादेवाचें नांव एकलिंग असें आहे. ह्यास सर्व सर्पांचेच अलंकार असल्यामुळें नागेंद्र हें जें त्या शहराचें नांव आहे तेंच त्यास दिलेलें असावें असें वाटतें. ह्या एकलिंगापुढें तिकडील लोकांचे अनेक नवस फिटत असतात. या देवापुढें एक पितळेचा नंदी आहे. या महादेवाचे पुजारी आपल्यास हारीत ऋषीच्या वंशांतील समजून हल्लीं ६५ पिढ्या झाल्या आहेत असें ह्मणतात. हें देवस्थान फार मोठें असून खुद्द उदेपूरचा राणा हा आपल्यास त्या देवस्थानाचा दिवाण असें ह्मणवितो. या एकलिंगाला पांढऱ्या पाषाणाचें फार सुंदर देवालय असून त्यावर नक्षीचीं वगैरे फार सुंदर कामें केलीं आहेत. या देवळावर म्लेंच्छ वगैरे शत्रूंचे हल्ले होऊन त्याची पूर्वीची शोभा व रचना जरी हल्लीं छिन्नभिन्न झाली आहे, तरी त्यावरून त्याच्या पूर्वीच्या वैभवाचें सहज अनुमान होतें. देवापुढें जो पितळेचा नंदी आहे तो भव्य असून पोकळ आहे. व त्याजवर झिलई चढविलेली असून त्याचें स्वतंत्र देऊळ आहे. या नंदीवर तार्तार वगैरे लुटारू म्लेंच्छांनीं, त्याच्या पोटांत संपत्ति सांपडेल ह्मणून, कोठें कोठें हातोडे मारिले त्यामुळें मात्र त्यास कांहीं पोचे पडले आहेत. बाकी हा नंदी पाहण्यासारखा आहे.

उदेपूरच्या या एकलिंग देवस्थानाजवळच नाथद्वारा ह्मणून श्रीनाथजीचें संस्थान असून तेथें गोसांवी महाराजांची मुख्य गादी आहे. एकलिंग व श्रीनाथ या दोन्ही देवांकडे रोजचा एक हजार रुपयांचा खर्च आहे. श्रीनाथ या देवाची मूर्ति पूर्वी गोकुळाजवळ एका डोंगरावर असून पुढें ती मुसलमानांचे गर्दींत जमिनींत पुरून टाकिली. ती तशीच कित्येक दिवसपर्यंत होती. पुढें इसवी सनाच्या पंधराव्या शतकांत त्या मूर्तीचें वल्लभाचार्यांकडून प्रकटीकरण होऊन तेव्हांपासून तिचा महोत्सव होऊं लागला. परंतु हा महोत्सव मुसलमानांस न बघवल्यामुळें त्यांनीं देवाचें संस्थान मोडण्याविषयीं हुकूम केला. तेव्हां वल्लभाचार्यांचा विठ्ठलनाथजी ह्मणून एक पुत्र होता त्यानें ती मूर्ति गाडीवर घालून उदेपूरच्या खोऱ्यांत आणिली. ती अद्यापि तशीच आहे. तिजवर देऊळ किंवा शिखर मुळींच नाहीं. या श्रीनाथजीच्या मूर्तीकरितां हजारों क्षत्रिय मेले आहेत. या संस्थानावर वल्लभाचार्यांचा वडील वंश असून हें संस्थान वल्लभी पंथांतील लोकांच्या मतानें सर्वांत श्रेष्ठ आहे. वल्लभानुयायी लोकांकडून या देवस्थानास दरसाल पांच लाख रुपये खर्चावयास

मिळतात. शिवाय त्या प्रांतांत चालणाऱ्या व्यापारावर या देवाचे कर असून, वाणी, भाट्ये वगैरे लोकांचें हें मुख्य यात्रास्थान असल्यामुळें, त्या यात्रेच्या संबंधानेंही श्रीनाथजीस मोठें उत्पन्न आहे. उदेपूर संस्थानाकडून या देवस्थानास एक लाख रुपये वर्षासन आहे. व्यापारावरील कराचे उत्पन्नास श्रीनाथजीचा 'लागा' असें ह्मणतात व हे 'लागे' महाजन लोक वसूल करून नियमित रीतीनें संस्थानीं पाठवितात. वर सांगितलेल्या एकलिंगजीचें देऊळ बाप्पाचे कारकीर्दीतच बांधिलें आहे. ह्याप्रमाणें उदेपूर प्रांतांतील उभय संस्थानांची हकीकत आहे.

बाप्पाचें संगोपन मोठ्या कष्टानें झालें हें वर सांगितलेंच आहे. बाप्पाचा पुढील आयुष्यक्रम आणि ऊर्जितकाळ मोठ्या चमत्कारिक रीतीनें घडून आल्याचें पुढें लिहिलेल्या हकीकतीवरून दिसून येईल. बाप्पा हा लहान असतां तो आपल्या समवयस्क मुलांमुलींमध्यें खेळत असे. त्याच्या या खिलाडू मंडळींतच नागड्याच्या सोळंखी ठाकुराची कन्या असून, एके दिवशीं त्या मुलांमुलींनीं खेळतां खेळतां बाप्पाच्या आणि तिच्या पदरास गांठ मारून खेळांतला लटका लग्नसोहळा केला व तेथें असलेल्या एका आम्रवृक्षास त्या खेळांतल्या वधूवरांकडून प्रदक्षिणा घालविल्या. हा लग्नांतला लुटीपुटीचा विवाहसमारंभ झाला खरा, परंतु हें सर्व वृत्त पुढें सोळंखीस कळल्यावर त्यानें आपल्या मुलीचा खेळांत झालेलाच विवाह मान्य करून ती मुलगी बाप्पालाच विवाहविधीनें दिली. याविषयींही चमत्कारिक हकीकत लिहिलेली आढळते. ह्मणजे, खेळांत त्या मुलीचें व बाप्पाचें लग्न मुलांनीं लाविल्याचें वगैरे सोळंखीस मुळींच माहित नव्हतें व माहित असण्याचेंही कारण नव्हतें. कारण, मुलांच्या खेळांत मुलें काय काय खेळ खेळलीं हें त्यांच्या आईबापांस समजून घेण्याचें कांहीं प्रयोजन नसतें. परंतु पुढें ती मुलगी उपवर झाल्यावर त्यांच्या नियमाप्रमाणें त्यांनीं आपल्या उपाध्यायास मुलीचा हात बघून वरयोजना करण्यास सांगितल्यावर त्या सामुद्रिक ज्योतिर्विद् उपाध्यायानें तिचा हात पाहिला; तों तिचें लग्न पूर्वीच झालेलें असावें असें त्याला तिच्या हातावरील सामुद्रिक चिन्हांवरून समजलें. तेव्हां सोळंखीला मोठा आचंबा वाटून त्यानें तपास चालविला व शेवटीं बालंपणचें मुलांचें खेळणें त्यास समजून वर लिहिल्याप्रमाणें त्यानें तिचें बाप्पाशीं विध्युक्त लग्न लावून दिलें आणि तिला मोठें आंदण दिलें. ह्याप्रमाणें रावळ आणि सोळंखी या दोन वंशांचा संबंध झाला.

बाप्पा हा चितोडच्या प्रमारांजवळ चाकरीस राहिला असून प्रमारांनीं त्याच्या हुशारीवरून त्याला एक गांव जहागीर दिला होता. बाप्पा हा मोठा भाग्यशाली निघेल असें, हारीतऋषीचे वंशीय जे एकलिंगजीचे पुजारी त्यांनीं त्याला आशी-

वचन दिलें होतें, व त्यास एकलिंगजीच्या भक्तीचा उपदेश केला होता. बाप्पाही त्यांच्या उपदेशाप्रमाणें शेवटपर्यंत एकलिंगजीचा मोठा भक्त होता. प्रमार राजाची बाप्पावर फार मर्जी असून तो त्याला आपल्या शूर सरदारांपैकीं समजत असे. एके वर्षी चितोडावर शत्रुसैन्य उतरल्यावर त्यांशीं लढण्यास जाण्याचा सरदारांमध्यें विचार निघाला. त्यांनीं प्रमारास सांगितलें कीं, 'आपण बाप्पाला लाडका सरदार करून ठेविला आहे; तेव्हां त्याची सरदारी कशी काय आहे ती या वेळीं बघूं द्या. त्यालाच या वेळीं शत्रूवर पाठवावें.'' सरदारांचें हें ह्मणणें ऐकून व प्रमाराची इच्छा बघून बाप्पा सैन्य घेऊन निघाला. तों तो शत्रूचा पाडाव करून तसाच पुढें मुलूख काबीज करीत करीत गिजनीपर्यंत गेला. त्यानें मुलूख जिंकीत जात असतां मार्गांत अनेक राजकन्यांशीं विवाह केले. नंतर तो चितोडास परत आला. अनेक जय मिळाल्यामुळें बाप्पा फार बलाढ्य झाला होता; व त्या बलाढ्यत्वाचा परिणाम शेवटीं त्यानें, प्रमारापासून—आपल्या यजमानापासून—त्याचें चितोडचें राज्य हिरावून घेण्यांत केला. बाप्पाला 'हिंदुवा सूरज,' 'राजगुरु' व 'चकवा' (चक्रवर्ती) असें ह्मणत. बाप्पानें चितोडचें राज्य घेतलें, ही गोष्ट सुमारें वि० सं० ७६४ ह्मणजे इ० स० ७०८ च्या सुमारास झाली.[१]

बाप्पाला संतति पुष्कळ असून त्यानें देशोदेशीं आपले पुत्र पाठविले होते. त्यानें इराण, तुराण, इस्पहान, कंदाहार, काश्मीर आणि काबूल वगैरे बहुत देश जिंकिले होते, व तेथील तेथील पराभूत राजांच्या कन्यांशीं विवाह केले होते. त्याला हिंदु आणि मुसलमान बायकांपासून एकंदर १३० मुलगे झाले होते.* त्यांत ९८ हिंदु राण्यांपासून, व ३२ मुसलमानी बायकांपासून झालेले होते. हिंदु पुत्रांस एकंदर 'सूर्यवंशी अग्न्युपासक' असें नांव असून मुसलमानी पुत्रांस 'नौषेर्य पठाण' असें नांव होतें. त्या मुसलमान ३२ पुत्रांनीं पुढें आपआपल्या आईच्या नांवानें पृथक् पृथक् जाति निरनिराळ्या ठिकाणीं स्थापन केल्या. बाप्पा हा शंभर वर्षांचा होऊन मेला. त्याला वर सांगितल्याप्रमाणें दोन्ही जातींचे पुत्र असल्यामुळें, तो मेल्यावर त्याचे शवाची व्यवस्था करण्याचे संबंधानें, त्या उभय जातींचे पुत्रांत वाद उत्पन्न झाला. हिंदु मुलें होतीं तीं ह्मणत कीं, त्याच्या शवाचें दहन करावयाचें आणि मुसलमानी मुलें ह्मणत कीं, त्याचें शव पुरून त्यावर कबर बांधावयाची. परंतु ह्याप्रमाणें त्यांचा वाद चालला असतां, त्यांनीं त्या शवावरील अस्तरण काढिलें

---

१. टॉड् साहेबाच्या इतिहासांत ह्या वर्षाच्या संबंधानें फार घोटाळा झालेला दिसतो. परंतु आह्मी बाप्पाच्या वेळचा जो सन वंशावळींत दिला आहे त्यास अविरुद्ध असा सुमारानें काळ दाखल केला आहे.

तों असा चमत्कार दृष्टीस पडला कीं, त्या शवाचे ऐवजीं तेथें कमलपुष्पांचा राशि मात्र असलेला दिसला! तेव्हां दोघांचाही वाद खुंटून त्यांनीं तीं फुलें स्वीकारिलीं व तीं सरोवरांतून लाविलीं. कोणी ह्मणतात, बाप्पानें आत्मखुषीनेंच मेरुमंदाराजवळ जिवंत समाधि घेऊन तो योगी बनला१. अस्तु. ह्याप्रमाणें बाप्पाचा आदिमध्यावसानाचा इतिहास आहे.

बाप्पाचे पुढें त्याचे वंशज सौराष्ट्र, मारवाड वगैरे ठिकठिकाणीं राज्य करीत होते ते अकबर बादशाहाचे कारकीर्दीपर्यंत होते' असा 'ऐन अखबारी' नांवाच्या मुसलमानी ऐतिहासिक ग्रंथांत दाखला आहे. बाप्पा वारल्यानंतर अठरा पिढ्या झाल्या; त्यांत अपराजित, कलभोज, नंदकुमार, खुमान (इ० स० ८३६), उल्लट (इ० स० ८६६), शक्तिकुमार (इ० स० ९६८), सामरसी (इ०स० ११५०) व कर्ण (इ० स० ११९३) इतकीं नांवें सांपडतात. यांतील नंदकुमार हा प्रमारकन्येचा मुलगा असून, त्यानें दक्षिणेंत देवगिरि घेतला होता, असा लेख सांपडतो. त्याचप्रमाणें, खुमान हा राज्यावर असतां इ० स० ८३६ मध्यें चितोडावर मुसलमानांची फौज आली असून तिचा खुमान यानें पराभव केला, असें 'खुमान रासा' नांवाच्या ऐतिहासिक ग्रंथांत लिहिलें आहे.

कितीएक ग्रंथांत असें लिहिलेलें आढळतें कीं, उदेपुरच्या राण्याचें, नौषेरवान-इ-अदिल ह्मणून जो इराणचा राजा होता त्याशीं नातें होतें. कारण, वल्लभीपुरावर जो म्लेंच्छांनीं हल्ला केला तो, नौषेरवान-इ-अदिल याचा मुलगा नौषीजाद यानेंच केला असून, त्यांत त्याचा पराभव झाल्यावर, त्याचे बरोबर असलेली त्याची आई, महाबानु, इजबरोबर शिलादित्याचे बापानें विवाह लाविला व तिचेच पोटीं शिलादित्य झाला. आणि ह्मणून, उदेपूर येथील क्षत्रियांचा व मुसलमानांचा शरीरसंबंध होणें वाजवी होतें असें ज्या रजपुतांनीं आपल्या मुली मुसलमानांस दिल्या ते ह्मणतात. परंतु हा जो संबंध ते दाखवितात तो केवळ, त्यांना आलीकडे आलीकडे मुसलमानबादशाहांस मुली देणें भाग पडूं लागलें व ती अपकीर्ति झांकली जावी ह्मणून दाखवितात. वस्तुतः असा कांहीं खरा संबंध असेल असा प्रत्यंतरींचा पुरावा नाहीं.

---

१. ज्या थोर पुरुषांच्या मृत्यूनंतर त्यांच्या शवाचे व्यवस्थेविषयीं तक्रारी पडतात, त्या शवाचीं फुलें झाल्याबद्दल ग्रथांत लिहिण्याची चालच आहे असें दिसतें. कबीर, एकनाथ इत्यादिकांच्या शवांचीही हीच स्थिति झाल्याबद्दल दंतकथा आहेत.

# भाग दुसरा.

## मुसलमानांची हकीकत.

मुसलमानांचा तुर्कस्थानांतून हिंदुस्थानांत पायरव व दळणवळण.—मुसलमान लोकांच्या चाली-रीती व हिंदु लोकांशीं त्यांचें वर्तन.—त्यांचें क्रौर्य व अतिप्रसंग.—मुसलमानांच्या स्वाऱ्या आणि हिंदुस्थानांतील वैभवाचा ऱ्हास.—मुसलमानांचें शौर्य व त्यांचें पुढें पाऊल.—मुसलमान व हिंदु इतिहासलेखक.—मुसलमानांच्या गर्दीमुळें क्षत्रियांमध्यें गडबड.—खुमानसिंह व प्रारंभीं ऐकमत्यानें मुसलमानांशीं लढणारे राजे.—क्षत्रियांचे आपसांतील तंटे.

वर लिहिल्याप्रमाणें चितोडचें राजघराणें राज्य करीत असतां मुसलमानांच्या ज्या स्वाऱ्या आणि धामधुमी चालून इकडील क्षत्रिय राजांस त्यांजपासून त्रास होत असे, त्या मुसलमानांची मूळची हकीकत आणि त्यांच्या राज्याचा पूर्वीचा इतिहास हा, या इतिहासाशीं संबंध जुळण्यापुरता थोडक्यांत सांगून, नंतर हातीं धरलेला इतिहास पुढें चालवूं.

मुसलमानी धर्मसंस्थापक महंमद पैगंबर याचे नंतर उमर खलिफा यानें टैग्रीस् नदीवर बसोरा हें बंदर बांधिलें. पुढें त्या बंदरावर पूर्वीपासून गुजराथ व सिंध येथील माल जात येत असे. ह्मणजे, तेव्हांपासून हिंदुस्थानाचें व तुर्कस्थानाचें परस्पर व्यापाराचे संबंधानें दळणवळण असे. त्याच वेळीं तुर्कस्थानांतला सरदार अबुल आस याची फौज गुजराथेपर्यंत आली होती. परंतु तिचा आरोर येथें जी लढाई झाली तींत सर्वाशीं नाश झाला. हा जो नाश झाला त्याचे शोधार्थ पुढें उस्मान खलिफा यानें कांहीं माणसें हिंदुस्थानांत पाठवून, : मागाहून आपण स्वत: सैन्यानिशीं हिंदुस्थानावर येण्याची तयारी करीत होता. परंतु तो त्याचा बेत सिद्धीस गेला नाहीं. पुढें उस्मानचा हेतु खलिफा अली यानें शेवटास नेऊन, त्याच्या फौजेनें हिंदुस्थानांत येऊन सिंध मुलूख घेतला. परंतु अली वारल्यानंतर सिंधेवरील त्याचा अंमल अगदींच उठला. पुढें अबदुल मलिक हा खलिफा असतां खुरासानच्या यजीदाच्या फौजा कितीएक वेळां हिंदुस्थानावर येऊन लुटीफांटी करून परत गेल्या. परंतु त्याचा अंमल मुळींच बसला नाहीं. पुढें मात्र सिंधप्रांतांत बरीच धामधूम उडाली. वलीद नांवाच्या तुर्क सरदारानें पुनः सिंध घेतली; व महंमद कासम नांवाच्या दुसऱ्या एका सरदारानें सिंध येथील दाहीर लोकांचे राजाच्या मुली धरून खलिफाकडे नजर पाठविल्या. ही गोष्ट इ० स० ७१८ मध्यें झाली असून ती 'ऐन अखबारी'मध्यें लिहिली आहे. त्यानंतर महंमद नांवाच्या एका मनुष्यानें कनोजचा राजा हरचंद याजवर स्वारी केली होती.

पुढें अल् मन्सूर यानें सिंधेवर स्वारी केली. त्याच वेळीं खुरासानचा बादशाह यज्द याचा मुलगा पळून सिंधेस आला होता व याच काळीं मुसलमानांचा प्रवेश फार लांबवर झाला होता. त्यांच्या फौजा फ्रान्सांत देखील शिरल्या होत्या; परंतु तेथें त्यांचा पराभव झाला. अल् मन्सूर यानें सिंधेंत बरेच दिवस राज्य केलें व तें त्यानें खलिफा आबास याचे नांवानें चालविलें. तो मनसोरा नांवाच्याच शहरांत राहत असे. मनसोरा या शहराचें पूर्वीचें नांव मीननगर असें होतें. त्या काळीं बाप्पा रावळ हा चितोडाहून इराणावर लढाईस गेला होता. तिकडे हरून् अल् रशीद यानें आपले राज्याची वांटणी केली त्यांत सिंध व हिंदुस्थान अल् मामून यास दिलें. पुढें अल् मामून हा इ० स० ८१३ मध्यें खलिफा झाला. तो खलिफा झाल्यावर त्याची फौज चितोडावर आली होती. पुढें त्या मुसलमानी राज्यामध्यें गडबड झाली, यामुळें तिकडून पुन: हिंदुस्थानाकडे फारसें सैन्य आलें नाहीं.

मुसलमान धर्माचे लोक ह्मणजे आरब, तुर्क, मोंगल, पठाण, सिद्दी इत्यादि अनेक असून तें हिंदुस्थानांत स्वधर्मस्थापनाच्या मिषानें शिरले होते. त्यांनीं लुटालुटी कराव्या व दंगे हाणामाऱ्या चालवून लोकांवर जुलूम करावे. त्या वेळीं हिंदुस्थानांत लढवय्ये लोक काय ते क्षत्रिय व रजपूत हेच असून बाकीचे अज्ञानी, भीरू आणि निरभिमानी असल्यामुळें त्यांनीं रणांतून पळून जावें. आणि मुसलमान लोक जे होते ते परदेशीय असल्यामुळें त्यांस आपल्या जीवाची पर्वा नसे व ते जीवावर उदार होऊन हिंदूंवर पडत, ह्मणजे जसा मेंढरांच्या कळपावर एखादा लांडगा पडला कीं, त्या दीन पशूंची दाणादाण होऊन जाते, तद्वत् हिंदूंच्या मेंढरासारख्या सैन्यावर मुसलमान लांडगे पडून त्यांचा फन्ना उडवीत. मुसलमान लोक हे स्वभावत:च निर्दय, क्रूर, आणि कट्टे धर्माभिमानी असल्यामुळें त्यांच्याकडून निष्ठुरतेचीं आणि अमानुषतेचीं कामें सहज होत व त्याबद्दल त्यांस क्षितीच वाटत नसे. ह्याप्रमाणें त्यांच्या हातांनीं जीं क्रूरकर्में झालीं तशीं पूर्वी रामायणीय व भारतीय महायुद्धें झालीं पण त्यांत कधींही झालीं नाहींत व तशीं क्रूर कर्में करण्याची कोणास कल्पनाही नव्हती. याचें कारण इतकेंच कीं, त्या युद्धांतील दोन्ही पक्ष एकदेशीय व एकधर्मी असल्यामुळें त्यांजकडून असे जुलूम आणि अनर्थ होण्याचा संभव नव्हता. परंतु विदेशी व विधर्मी लोकांशीं प्रसंग पडल्यामुळें आणि ते अतिदुष्ट व क्रूरकर्में असल्यामुळें त्यांजकडून एतद्देशीयांस फार दु:खें, यातना आणि नुकसान सोसावें ला-

---

१. वर अशी गोष्ट लिहिली आहे तरी, परशुरामाचें क्षत्रियांशीं वर्तन, व अश्वत्थाम्याचें भारती युद्धांतील क्रौर्य हीं कांहीं सामान्य नव्हेत. अशीं नीच कामें करणारे अनेक वीर, राजे आणि मुत्सद्दी सर्वकाळीं व सर्वदेशीं होऊन गेले आहेत!

गलें. व सर्व अपमानांत व छलांत स्त्रियांवरील जुलूम आणि त्यांस भ्रष्ट करण्याची त्यांची परम निंद्य रीति हीं बिनधोक चालत, यामुळें हिंदु लोकांना आपल्या बायका मारून टाकणें किंवा सती घालविणें अथवा त्यांजकरितां गोषा, पडदा व मराठमोळा ठेवणें, या अति क्रूरपणाच्या रीति स्वीकारणें प्राप्त झालें.

मुसलमानी गर्दीचा सर्व भार क्षत्रियांवरच पडून चितोड, दिल्ली, मथुरा, कन्नोज, लाहोर, इत्यादि ठिकाणीं त्या लोकांचा सत्यानाश झाला व अपरिमेय क्रौर्यानें त्यांची अत्यंत छलना झाली. हिंदु लोकांची हत्या करणें, त्यांच्या दौलती लुटणें, स्त्रिया भ्रष्ट करणें, लोकं बाटविणें आणि देवस्थानें बुडविणें, याविषयीं त्यांचा मोठा अभिमान असून त्या गोष्टी करणें ह्मणजे मुसलमानी धर्माप्रमाणें मानवी देहाची सार्थकता झाली असें त्यांस वाटे. त्यामुळें कोणत्याही काळीं हिंदु व मुसलमानांचें सख्य व परस्पर महत्व ह्मणून कधींच आढळण्यांत आलें नाहीं. इतिहासांत पानपतचें रणकंदन व आलीकडे झांशी, काल्पी, कानपूर, इत्यादि ठिकाणचे प्रसंग ह्मणजे हिंदुमुसलमानांच्या परस्पर द्वेषांचीं मूर्तिमंत चित्रें आहेत !

अस्तु. प्रसंगवशात् ही मुसलमानांची माहिती सांगितली. ह्या प्रकारच्या जुलमी व अपहारी लोकांपासून हिंदु लोकांस फार त्रास भोगावा लागला. वर लिहिल्याप्रमाणें इ० स० ८१३ मध्यें अल् मामून हा खलिफा झाला व पुढें त्याच्या राज्यांतच गडबड झाल्यामुळें मुसलमानांस हिंदुस्थानाकडे बघण्यास झालें नाहीं; तरी खुरासानचा सुभेदार सबक्तेगीन यानें गिजनी घेऊन तो इ० स० ९७५ मध्यें हिंदुस्थानावर आला. या समयीं त्याचा मुलगा ज्यास माहमूद गिजनवी असें इतिहासांत ह्मटलें आहे, तोही त्याजबरोबर होता. सबक्तेगीनानें आपल्या मुसलमानी ब्रीदाप्रमाणें हिंदु लोकांस बाटविण्याचा व लुटण्याचा सपाटा चालविला होता व त्याची कमाल व अखेरी त्याच्या पुत्रानें केली. माहमूद गिजनवी हा पुढें हिंदुस्थानावर बारा वेळां येऊन गेला व त्या प्रत्येक वेळीं त्यानें हिंदुस्थानांतून अमुप द्रव्यसांठा नेला; हजारों देवळांचा विध्वंस करून लक्षावधी माणसांचा फन्ना उडविला; आणि सर्व देशांत हाहाःकार आणि भिकारपणा हे दोन मात्र अवशिष्ट ठेविले! रामचंद्रापासून युधिष्ठिरापर्यंत जी कांहीं संपत्ति, जें कांहीं ऐश्वर्य आणि जें कांहीं वैभव हिंदुस्थानांत सांठून राहिलें होतें तें सर्व नष्ट होऊन या देशाची जी कळा बिघडली ती पुनरपि कांहीं नीट झाली नाहीं ! अबू, गिरिनार व चितोड या ठिकाणचीं अनेक मोठमोठीं देवळें, टोलेजंग इमारती आणि भरभराटीचीं शहरें दरोबस्त मातीस मिळालीं !

या मुसलमानी स्वाऱ्यांच्या वेळेस चितोडास कोण राजे होते तें 'राजावलि ३'-

वरून समजेल. दिवसेंदिवस मुसलमानी लष्कर फार मोठें जमत चाललें. महंमद पैगंबराला शंभर वर्षे झालीं नाहींत तोंच अरबस्थानापासून हिंदुस्थानापर्यंत मुसलमान येऊन पोहोंचले, इतकी त्यांची तरवार जलद होती. त्यांनीं ख्रिस्ती व इस्रायल लोकांशीं लढाया मारून त्यांचे मुलूख घेतले व तुर्कस्थान, इराण व काबूल वगैरे घेऊन ते हिंदुस्थानावर दाखल झाले. मुसलमानांत शेख, सय्यद, मोंगल व पठाण असे भेद निरनिराळ्या वर्गांकरितां पडले आहेत. शेख म्हणजे अरब लोकांतील प्रतिष्ठित लोक; सय्यद हे पैगंबराच्या दौहित्राचे वंशांतील लोक; इराणचे पार्शी बाटविले ते मोंगल लोक; आणि काबूल प्रांतांतील जे क्षत्रिय बाटविले गेले ते पठाण होत. मुसलमानांनीं प्रारंभीं रूमशाम म्हणजे कॉन्स्ट्यान्टिनोपल् व सीरिया हे प्रांत काबीज करून तिकडे मुसलमानी धर्म आणि राष्ट्र हीं स्थापन केलीं होतीं व इकडे चितोडापर्यंत मुसलमानांची फौज येऊन दाखल झाली होती.

मुसलमानी इतिहासकारांची किंवा खुद्द राजकीय अकबरनविसांची ही एक गोष्ट ध्यानांत धरण्यासारखी आहे कीं, जेथें त्यांचा अपमान, पराजय अथवा इतर कांहीं व्यंग दृष्टीस पडण्याचा प्रसंग येईल तेथें तो निखालस टाळून पुढें चालावयाचें अशी त्यांची रीति असे. परंतु हा प्रकार हिंदु लेखकांमध्यें आढळत नाहीं. त्यांनीं जें होईल तें टिपण्याचा क्रम ठेविला होता. इतकेंच नव्हे, तर मुसलमानांचे लहानसान दंगे धोपे आणि लूटीफांटी देखील त्यांनीं टिपल्या आहेत. यांत त्यांचा दोष म्हणून हाच आढळतो कीं, त्यांस माहिती म्हणून कांहीं नव्हती. हे येवढे मुसलमान लोक आले कोठून व त्यांचें मूलस्थान कोणतें आहे वगैरेंची त्यांस बिलकुल माहिती नव्हती. व या अज्ञानामुळें त्यांच्या लेखांत त्यांजविषयीं भलभलतेंच लिहिलेलें आढळतें. त्यांनीं, कोणास सिंधेहून आले व कोणास समुद्रांतून आले, असें म्हणून कोणास 'राक्षस,' कोणास 'अवलिया,' कोणास 'म्लेंच्छ,' कोणास 'महाभट्टारक' अशीं नानाप्रकारचीं नांवें दिलीं आहेत.

मुसलमानांची हिंदुस्थानांत खळबळ सुरू होऊन क्षत्रियराजांची डळमळ होऊं लागण्यास इ० स० ७२४ पासून प्रारंभ झाला. त्यांनीं प्रथमत: पंजाबांतून भाटी[1] क्षत्रियांस हांकून दिलें. आणि त्याचप्रमाणें पुढें त्यांच्या फरीद नांवाच्या एका सरदारानें

१. सांप्रत जसलमीर व बिकानीर या प्रांतांचे राजे 'भाटी' नांवाच्या क्षत्रिय जातीचे आहेत. मुंबईस जे भाट्ये लोक आहेत ते क्षत्रिय वर्णांचेच असून वैष्णव पंथाचे अतएव अहिंसक मताचे आहेत. यांचे गुरु वल्लभाचार्य व त्याचा पुत्र विठ्ठलनाथ हे आहेत. भाट्यांची वस्ती कच्छ, मांडवी व पोरबंदर या प्रांतीं आणि दर्याकिनाऱ्यावर असून त्यांचा क्षात्रधर्म हल्लीं रद्दी पडला व त्यांनीं वाणिज्य (व्यापार–वैश्यधर्म) स्वीकारिलें आहे!

अजमीरचा माणिकराय यास ठार मारिलें. यामुळें क्षत्रियांत एकंदर जिकडे तिकडे धांदल होऊन, चव्हाण, चावडा, गेहलोट, भाटी वगैरे क्षत्रियवंशांची मोठी दाणादाण झाली होती. जिकडे तिकडे असुर, म्लेंच्छ, गनीम हे शब्द सर्वांचे तोंडांत होते. चितोडावर जी फौज प्रारंभीं आली होती तींत, अंगटशी नांवाचा हूणराजा, बुसा उत्तराधिपति, शिव नांवाचा जाडेजांचा राजा, जांगलदेशाधिपति जोहिया व दाहेरचा राजा, वगैरे होते असा इतिहास सांपडतो. या स्वारीचा बाप्पा रावळ यानें पराभव केला. हे जे मुसलमान चितोडावर आले होते हे मथुरेकडून खालीं उतरले व सिंध काठेवाड इकडून परत गेले. बाप्पा रावळाचें असें ह्मणणें होतें कीं, गिजनी शहर मूळचें क्षत्रियांचें असून तें असुरांनीं (मुसलमानांनीं) घेतलें, हें नीट नाहीं. ह्मणून, त्यानें गिजनीवर स्वारी करण्याची तयारी केली. त्या वेळीं गिजनीस सेलीम ह्मणून मुसलमान राजा होता. गिजनीवर स्वारी करून बाप्पानें सेलिमाचा पराभव केला आणि गिजनी काबीज केली. याच स्वारींत बाप्पानें सेलिमाची कन्या आपली बायको केली[१].

पुढें चितोडास खुमान हा इ० स० ८३६ सालीं राज्यावर असतां पुनः मुसलमानांची गर्दी झाली. त्या वेळीं अनेक राजे एकत्रपणें खुमान यास साह्य होऊन त्यांनीं ती गर्दी मोडिली. 'खुमान रासा' नामक जो प्रसिद्ध ऐतिहासिक ग्रंथ आहे त्यांत पुढील राजांचीं नांवें खुमानाचे साह्यकर्त्यांमध्यें घातलेलीं दाखल आहेतः—गिजनीचा गेहलोट, अशीरगडचा टांक, नांदोलचा चव्हाण, राहिरगडचा चालुक्य, शेतबंदरचा जिरकेडा, मंदोडचा खैरावी, मांगरोळचा मकवाहन, जेतगडचा जोडिया, तारागडचा रेवड, नरवरचा कच्छवाह, सांचोरचा कालम, जो-

---

१. पूर्वी क्षत्रियांमध्यें कोणाचीही मुलगी बायको केली तरी चालत असे. हिंदुस्थानांत क्षत्रिय व रजपूत या वेगवेगळ्या जाती आहेत. त्यांत क्षत्रिय हे श्रेष्ठ असून रजपूत त्यांजपेक्षां कमी दर्जाचे लोक आहेत. तरी बहुतेक रजपूत राजे आपल्यास क्षत्रिय असें ह्मणवितात. दक्षिणेंत मराठे आणि कुळंबी यांजमध्यें जें अंतर आहे तितकेंच अंतर क्षत्रिय व रजपूत यांजमध्यें आहे. मराठे व कुळंबी यांचा जसा रोटी-व-बेटीव्यवहार होतो तसाच क्षत्रिय व मराठे यांचाही रोटी-व-बेटीव्यवहार होतो. परंतु इकडील मराठ्यांस जर 'तुह्मी कुळंबी आहांत कां ?' ह्मणून विचारिलें तर त्यांस जसा राग येतो, तसाच क्षत्रियांस जर 'तुम रजपूत हो क्या ?' असें विचारिलें असतां त्यांना राग येऊन ती त्यांस निंदा वाटते, व तें 'हम् रजपूत नहीं, छत्री है' असें उत्तर देतात. आतां हा केवळ मानसिक भेद आहे. क्षत्रियांमध्यें खत्री ह्मणून रेशीम वगैरे कापड विणणारी एक जाती असून ती हल्लीं मुंबई, चौल, सिंध, पंजाब, वगैरे प्रांतांत आहे. परंतु ते लोक दुसराच धंदा करूं लागल्यामुळें भाट्यांप्रमाणेंच क्षत्रिय व रजपूत या दोहींतूनही ते वेगळे झाले.

नगडचा दसाना, अजमीरचा गोर, लोहदरगडचा चंदाना, कासुंदीचा दोर, दिल्लीचा तुवर, पट्टणचा चावडा, झालोरचा सोनीगडा, सिरोहीचा देवडा, गागरोनचा खिची, जुनागडचा जाधव, पात्रीचा झाला, कनोजचा राठोड, छोट्यालाचा बाला, पेरनगडचा गोहेल, जसलगडचा भाटी, लाहोरचा बुसा, रोनेजाचा सांखळा, खरलीगडचा सिहट, मंडलगडचा निकुंपा, राजोरचा वीरगुजर, कर्णगडचा चंदेल, सिकरचा सिकरवाळ, उमरगडचा जेठवा, पालीचा बीरगोटा, खंतरगडचा जाडेजा, जीरगाचा खेरवड, काश्मीरचा परिहार, वगैरे. यांतील कित्येक राजकुलें पुढील मुसलमानांचे कारकीर्दींत अगदीं बुडालीं. त्या वेळीं लाहोरचें राज्य बुसावंशीय जयपाळ नांवाच्या राजाकडे असून त्या राज्यांतच काश्मीर, मुलतान व सरसिंद हे प्रांत होते. जयपाळ हा आपल्या एक लक्ष फौजेसहवर्तमान सबक्तेगीनावर जाऊन त्यानें त्याचा एकदा पराभव केला होता. पुढें तो माहमूदाकडून धरला गेला व त्याजजवळ बंदींत असतांच त्यानें जीव दिला; अशी त्याची हकीकत आहे. याचप्रमाणें त्या वेळीं जुनागडास जाधव(यदु)वंशीय खेंगार नांवाचा राजा होता. अस्तु. खुमान हा मोटा शूर असून त्यानें मुसलमानांबरोबर २४ लढाया मारिल्या. त्यानें शेवटीं ब्राह्मणांच्या सांगण्यावरून आपलें राज्य त्याचा धाकटा मुलगा योगिराज ह्मणून होता त्यास देऊन आपण वानप्रस्थाश्रम स्वीकारिला होता. परंतु पुनः काय झालें कोण जाणें; त्यानें परत येऊन पुनरपि पुत्राकडून सर्व राज्यकारभार आपलेकडे घेतला व असें करण्यांत त्यानें ब्राह्मणांचाही फार अपमान केला. परंतु शेंवटीं तो आपल्याच मंगल नांवाच्या पुत्राकडून मारला गेला. मंगल यानें पितृहत्येचें अमंगल कृत्य केल्यामुळें पुढें खुमान याच्या सरदारांनीं त्यास चितोडाहून हुसकून दिलें, तेव्हां मंगल यानें उत्तरेकडे जाऊन लोदडवा प्रांतांत मांगोलिया गेहलोट या नांवाचें नवीन राज्य स्थापन केलें.

अजमीरचे चव्हाण व चितोडगडचे गेहलोट यांची कधीं कधीं मैत्री असे व कधीं कधीं वैर असे. वेरशी रावळ यानें दुर्लभ चव्हाण यास ठार मारिलें होतें. परंतु दुर्लभाचा मुलगा वीसलदेव व चितोडचा रावळ तेजसी हे उभयतां मिळून सख्यानें मुसलमानांवर गेले होते. खुमानपासून सामरसीपर्यंत पंधरा राजे झाले. त्यांचे गुण पाहिले तर असे होते कीं, ते सर्व निरक्षर होते तरी शूर असून त्यांनीं आपल्या ज्वानींत मारून लुटालुटी व हाणामाऱ्या कराव्या; घोडे, शिकारी व हत्यारें यांचा षोक करावा आणि ह्मातारपणीं देवळेंरावळें व देवदेवतार्चन करावें. त्याचप्रमाणें अंगांत करारी असतांना लढण्यास व भांडण्यास शत्रु नसला ह्मणजे आपसांत भावाबंदांशींच कज्जे व भांडणें करावीं अशी त्यांची रीति होती.

# भाग तिसरा.

## वल्लभीपूरची हकीकत व सामरसी राणा.

प्रारंभापासून क्षत्रियांचा इतिहास.—त्यांचे आपसांतील वाद.—मत्सराचें व वादाचें कारण.—क्षत्रियांची अभिमानवृत्ति.—सामरसी व त्याचे पुढील वंशज.—सामरसीच्या पुढील चितोडाचे राजे व चंद्रावतांचें राज्य.

इसवी सनाचे दुसरे शतकांत कनकसेन झाला; वल्लभीपुर वसविणारा विजय हा चवथे शतकांत झाला; व सामरसी (समरसिंह) हा बाराव्या शतकांत झाला. याविषयीं भाटांच्या ग्रंथाधारें काय इतिहास मिळतो तो बघूं.

सामरसी हा विक्रम संवत् १२०६ मध्यें झाला. त्या काळीं पुढें लिहिलेले राजे हिंदुस्थानांत होते असें चंद भाट लिहितोः—पट्टण (गुजराथ) येथें चालुक्यवंशीय भोळा भीमदेव हा मोठा पराक्रमी व बलिष्ठ राजा होता. अबूवर जेत प्रमार नांवाचा राजा असून त्याची अशी ख्याति असे कीं, तो युद्धांत ध्रुवासारखा अचल व गंभीरतेनें असे. मेवाडांत वरील सामरसी (समरसिंह) हा राजा असून तो आपल्या नांवाप्रमाणेंच समरसिंह होता. मंदोड येथें नाहरराय नामक राजा महानिर्भय आणि शत्रूंस अजिंक्य असा सिंधदेशापासून काशीपर्यंतच्या विस्तीर्ण प्रदेशाचें राज्य करीत होता. आणि दिल्लीस अनंगपाल हा राजा चक्रवर्तित्वानें राज्य करीत होता.

चव्हाण व राठोड यांनीं आपसांतच लढून आपला नाश करून घेतला. त्यांच्या वादाचें कारण असें झालें कीं, कन्नोजचा राजा जयचंद याचा बाप विजयपाल यानें तुवर कुळांतली कन्या आपल्याला बायको केली होती, व सोमेश्वराचीही त्याच कन्येविषयीं मागणी होती. यामुळें त्या परस्पर कुलांत मत्सर उत्पन्न होऊन शेवटीं दोन्हीही कुळें नष्ट झालीं. या दोघांच्या वादांत उभय पक्षांनाही अनेक राजे मिळाले व त्यांचाही त्यांबरोबरच पुष्कळ नाश झाला. याच वेळेपासून कन्नोज व पट्टण येथील ठाकुरांनीं लढाईकरितां मुसलमानी फौजा ठेविल्या. परंतु पुढें त्याच फौजा त्यांच्या राज्यवैभवाचे समूळ उत्पाटनास कारण झाल्या. म्हणजे, याच फौजांच्या जोरानें गिजनीच्या मुसलमान राजांनीं हिंदु राजांस पादाक्रांत केलें. असु. या वादाचेच वेळेस सामरसी यानें पृथ्वीराजाचे बहिणीशीं लग्न केलें. त्यामुळें त्या दोघांचें सख्य जमून त्यांनीं पट्टणच्या ठाकुराचा द्वेष उगविला. सत्ययुगापासून पाहिलें तरी हिंदुस्थानांतील राज्यवैभवशाली पुरुषांची ही एक परंपरेची चाल चालत आलेली दिसेल कीं, त्यांनीं आपसांतल्या आपसांतच भांडावें आणि शेवटीं त्याम-

ध्येंच मरावें. रामायण, भारत व भागवत हे काव्य व ऐतिहासिक ग्रंथ बघितले तरी त्यांतून याच मासल्याच्या उदाहरणांची रेलचेल आढळेल. परशुरामावतारापासून तो परवांच्या पेशवाईच्या अखेरीपर्यंत पाहिलें तर युद्धांचे, लढायांचे आणि हाणामाऱ्यांचे प्रसंग आपसाआपसांतच आलेले फार आढळतील. व्यक्तिविषयक अथवा राष्ट्रीय इतिहासांत आपसांतील वैराचेंच बीज येथून तेथवर भरलेलें दिसेल. याचें कारण उघड आहे कीं, परोत्कर्षासहिष्णुता आणि मत्सर या दोन दोषांचें बिऱ्हाड हिंदुलोकांच्या मनांत जें भरलें तें आजपर्यंत तसेंच अप्रतिबद्ध व ठाम होऊन राहिलें आहे आणि त्याचीं फळेंही त्यांस वेळोवेळीं मिळत आलीं आहेत !

राजा जयचंदानें चितोड घेतलें. त्याचप्रमाणें पृथ्वीराज यांस नागोर येथें सात कोट द्रव्य सांपडलें. आतां हें द्रव्य कोणीं ठेविलें होतें कोण जाणे, पण तें जुन्या काळीं कोणी तरी ठेवा ह्मणून ठेविलें असावें असें वाटतें. हा खजिना पृथ्वीराजास मिळाला व जयचंदराज चितोडावर यशस्वी झाला हें पाहून परोत्कर्षासहिष्णु व मत्सरी अशा कनोज व पट्टण येथील क्षत्रियराजांनीं उत्तरेकडून शहाबुद्दीन गोरी यास मदतीला घेतलें आणि वरील उभय राजांस हलकें करावें ह्मणून त्यांजवर स्वाऱ्या केल्या. त्या वेळीं पृथ्वीराजानें सामरसीच्या साह्यानें शहाबुद्दीनाचा पराभव करून त्यास कैदेंत टाकलें. ह्याप्रमाणें त्याचा कित्येक वेळां पराजय झाला व तो कित्येक वेळां पृथ्वीराजाचे हातीं सांपडून सुटला. पण त्याच्या प्रत्येक स्वारीमध्यें पृथ्वीराजाला ह्मणून इतर क्षत्रियराजांनीं साह्यास न येतां स्वस्थ मौज बघत काय होतें तें पाहण्यासाठीं तिऱ्हाइतासारखें राहावें ! याचें कारण उघडच आहे कीं, पृथ्वीराजाचा पराक्रम व ऐश्वर्य त्याच्या देशबंधूंस व जातभाईस सहन करवत नसे. शेवटीं शहाबुद्दीनाशीं लढण्यांतच पृथ्वीराजाचा व सामरसीचा अंत झाला. आणि दिल्ली, कनोज व चितोड हीं राज्यें दरोबस्त उद्वस्त होऊन मुसलमानांच्या ताब्यांत गेलीं.[१] मुसलमानांच्या हातीं हिंदुराज्यपदें गेल्यावर मग तेथें कोणत्या प्रकारानें त्यांचें वर्तन राहातें व त्यापासून तेथील प्रजाजनांस किती यातना, दुःखें व संकटें सोसून, त्यांच्या जीववित्ताची त्यांना किती अस्थिरता वाटते, याविषयींचें वर्णन येथें देण्याचें कारण नाहींच. हिंदूंच्या राजधान्यांतून मुसलमानांचा प्रवेश झाल्यावर त्यांच्याकडून तेथें चालणाऱ्या हाणामाऱ्या, लुटालुटी, मोडामोडी व फोडाफोडी ह्या

---

१. याविषयींचा साद्यंत इतिहास लोकहितवादीकृत 'पृथ्वीराजचव्हाण यांचा इतिहास' या नांवाच्या पुस्तकांत सांपडेल, व ह्या इतिहास वाचिला असतां त्या वेळचा आणखी कित्येक महत्वाचा इतिहासही मिळेल.

मुसलमानांच्या इतिहासांतील ध्यानांत ठेवण्यासारखा मुख्य व अवश्य भाग होय व त्याप्रमाणें वरील मुख्य राजधानींच्या शहरांतून तेथील व पुढें परंपरेनें सर्व देशांतील लोकांस अनुभवही आला आहे.

जगावरील अनेक देशांत अनेक राज्यक्रांती झाल्यामुळें तेथील लोकांचे मूळचे आचारविचार व रीतिभाती शेवटपर्यंत कायम राहिल्या नाहींत व तशा रहाणें मुष्किलीचेंही खरेंच. इंग्लंडांत रोमचें राज्य होऊन त्यांचें प्राबल्य झाल्यावर तेथील लोकांचे धर्म, धर्माधिकारी (ड्रुइड)'व होमहवनें वगैरे आचार हे कायम रहावे ह्मणून इंग्रजलोक पुष्कळ झटले. परंतु काय झालें? कांहीं नाहीं. इतकेंच नव्हे, तर पुढें ज्या ज्या लोकांचा त्या देशावर अम्मल बसला त्यांनीं त्यांनीं तेथील पहिले धारे, दस्तुर व रीतरिवाज दरोबस्त फिरवीतच जावें असा प्रकार आढळतो. इंग्लंडांत रोमन् लोकांचे मागून डेन्स्, नॉर्मन् वगैरे लोकांचा अंमल झाला व त्या त्या प्रमाणें त्यांनीं आपल्या रीतिभाती व आचारव्यवहार त्या देशांत चालू केले. आणि ही गोष्ट सहज आहे कीं, जिंकणाऱ्या लोकांचे रीतरिवाज जिंकलेल्या लोकांमध्यें सुलभतेनें प्रसृत होतात व याचीं उदाहरणें मिसर, इराण वगैरे अन्य देशांत घडलेलीं अनेक आहेत. परंतु हिंदुस्थानांतील क्षत्रिय लोकांची धन्य आहे कीं, ते मुसलमानांचे अमलांत शेंकडों वर्षें राहून त्यांजशीं झुंजले; पण त्यांनीं आपल्या प्राचीन चालीरीती व धर्म हीं बिघडूं दिलीं नाहींत! क्षत्रियांच्या धिम्मेपणाची, सोसकतेची आणि पराक्रमशालितेची गोष्टच कांहीं वेगळी आहे. जेव्हां विजयी मुसलमानांचा जुलूम होई तेव्हां ते तो स्वस्थपणें पडून सहन करीत, आणि पुढें फावेल तेव्हां सूड घेत. यामुळें क्षत्रियांच्या जुन्या धर्माचा व रीतीभातींचा अगदीं बींमोड कधींच झाला नाही. मुसलमान हिंदुस्थानांत जेथें जेथें व जेव्हां जेव्हां शिरले तेथें तेथें व तेव्हां तेव्हां त्यांनीं अशी दंगल उडवावी कीं, हिंदूंचें ह्मणून कांहींएक राहूं न देतां त्यांच्या धर्माचा, धर्मसंस्थानांचा आणि त्यांच्या आचारविचारांचा उच्छेद करून टाकण्याविषयीं पराकाष्ठा करावी. त्याचप्रमाणें त्यांचा निश्चय असा असे कीं, आपला धर्म सर्वत्र पसरून जुन्या गोष्टींचा नाश करावयाचा. परंतु रजपूत लोकांस अशी एक हातोटी साधली होती कीं, ते प्रसंग पडेल तसे नम्र होत, सहनशील होत आणि पुनः वस्ताद बनून आपला सूड उगविण्यास उभे रहात. अनेक क्षत्रियकुळें बुडालीं, शेंकडों शहरें आपल्या पूर्ववैभवास मुकलीं आणि राज्यव्यवहारांत अनेक प्रकारच्या खलबली व उलाढाली झाल्या. परंतु उदेपूरच्या सिसोदे घराण्यासारख्या क्षत्रियांनीं मुसलमानांस कधींच दाद न देतां आपला जात्यभिमान व धर्माभिमान कायम ठेविला हें त्यांस मोठें भूषण होय.

सामरसीचा मुलगा कल्याणराय मेल्यावर मुसलमानांच्या आणि रजपुतांच्या आणखी कित्येक लढाया झाल्या, व त्यांत हजारों रजपूत मेले. परंतु त्यांनीं आपले महद्भूषणावह असे जातिधर्माभिमान आणि स्वातंत्र्यप्रीति यांची हानि होऊं दिली नाहीं. सामरसी यास स्त्रिया पुष्कळ असून त्यांजपासून त्याला मुलगेही पुष्कळ झाले होते. आणि त्या काळीं ज्यास पुष्कळ मुलगे असतील तो प्रबळ असें मानण्याची चाल होती. सामरसी याचे मुलांत कर्ण, कल्याणराय आणि तिसरा एक असे प्रसिद्ध होते. कर्ण हा, कोरमदेवी ह्मणून पट्टणची राजकन्या जी सामरसीची पत्नी होती तिचा मुलगा असून, कल्याणराय हा तर बापाबरोबरच शहाबुद्दीन गोरीशीं लढण्याकरितां पृथ्वीराज चव्हाणास साह्य करण्याकरितां गेला असतां बाप व तो मारला गेला. आणि तिसरा जो मुलगा होता तो गुरखे लोकांचा पुढारी झाला होता. सामरसी मेला तेव्हां कर्ण हा लहान असून त्याचे पश्चात् तोच वारस होता. मुसलमानांची तर बंडाळी आणि धामधूम चालली होती. अशा स्थितींत कोरमदेवी इणें आपल्या रजपूत सैन्याचें पुरोगामित्व पतकरून कुतुबुद्दीनाशीं अंबेराजवळ लढाई दिली. ह्या वेळीं राणीजवळ अवघे नऊ ठाकूर आणि रावत किताबाचे अकरा सरदार इतके मात्र शूर लोकांपैकीं होते. ह्या लढाईंत कुतुबुद्दीन यास पुष्कळ जखमा होऊन त्याचा पराभव झाला. पुढें इ० स० ११९३ मध्यें कर्ण गादीवर बसला. सामरसीचा भाऊ सुरजमल्ल ह्मणून असून त्याचा मुलगा भरत नांवाचा होता. तो चितोडाहून सिंधदेशांत गेला, आणि तिकडे त्यानें मुसलमानांपासून कांहीं मुलूख घेऊन भाटीराजाची मुलगी बायको केली. तिच्या पोटीं त्याला रहूप नांवाचा मुलगा झाला होता. भरत याचें व कर्णाचें परस्पर फार प्रेम असून भरत मेल्यावर त्याच्या शोकदु:खानेंच कर्ण मेला असें ह्मणतात. कर्णाची मुलगी झाकेरचे राजास दिली होती. व त्याचा मुलगा सिरवण हा व्यापाराचे कामांत पडला होता. या सिरवणापासूनच सिसोदिया रजपुतांत सिरवणिया ह्मणून व्यापाऱ्यांची शाखा निघाली. कर्णाच्या मुलीला रणधवल ह्मणून मुलगा होता व तोच कर्णाचे पश्चात् चितोडचे गादीवर आला. कारण, त्याचा मुलगा सिरवण हा व्यापारीधंद्यांत पडला होता ह्मणून त्याची गादी त्याच्या नातवाकडे गेली. परंतु चितोडाहून एक भाट सिंधेंत रहूप याजकडे जाऊन त्याला फौजेसुद्धां चितोडावर घेऊन आला. ही गोष्ट वि० सं० १२५७ किंवा इ० स० १२०१ मध्यें घडली.

---

१. रणधवल याचा आजा कर्ण व रहूप याचा बाप भरत यांचें परस्पर किती प्रेम होतें हें सांगितलेंच आहे. त्याच भरताचा पुत्र पुढल्या पिढीस कर्णाचे वारसाचा वैरी झाला. तेव्हां राज्यवैभवाचे लोभापुढें मित्र बंधु हे सर्व शत्रुवत् होत असें रजपूत समजत असत असें दिसतें!

रहूप आपली फौज घेऊन चितोडावर आला व त्यानें चितोड सर केलें तोंच तिकडून शमसुद्दीन हा फौज घेऊन चितोडावर आला. तेव्हां त्या उभयतांची नागोरास लढाई होऊन मुसलमानांचा पाडाव झाल्यामुळें ते पळाले. ह्या वेळेपर्यंत चितोडची गादी गेहलोट या वंशाचे नांवावर चालत होती तें वंशनाम बदलून सिसोदिया हें नांव चितोडच्या राजवंशास चालू झालें. तसेंच, शमसुद्दीनास चितोडावर चालून येण्याकरितां मोकल परिहार हा सौह्य झाला होता ह्मणून त्याचें राज्य घेऊन त्याचा 'राणा' हा किताब रहूप यानें आपल्यास घेतला. व तेव्हांपासून चितोडच्या राजास 'राणा' असें ह्मणूं लागले. रहूप यानें चितोडास ३८ वर्षें राज्य केलें.

पुढें रहूपापासून लखमसी(लक्ष्मणसिंह)पर्यंत नऊ राजे झाले; त्यांपैकीं सहा राजे चितोडासच रणसंग्रामांत मेले आणि तीन गयेकडे मेले. त्या वेळीं गयेवर मुसलमानांनीं हल्ले केले ह्मणजे इकडून चितोडाहून रजपूत राजे गयाक्षेत्राचे संरक्षणार्थ जात असत. शेवटीं अल्लाउद्दीनापासून मुसलमानांनीं गयेकडे जाण्याचें सोडिलें. गयेच्या गडबडींत पृथ्वीमल्ल व भुन्सी हे प्रसिद्ध लढवय्ये मेले. त्यांत भुन्सीचा मुलगा चंद्र यानें रामपूर (भानपूर) येथें राज्य स्थापन केलें. व तेव्हांपासून तेथें चंद्रावत ह्मणून रजपूतघराणें स्थापन होऊन त्यांचा राज्यविस्तार पुढें नऊ लाखापर्यंत झाला. चंद्रावतवंशाला चितोडचा राणा जगत्सिंग यानेंही सनद दिली होती. पुढें, अंभेरचा राजा माधवसिंग यानें हें चंद्रवतांचें राज्य होळकरास दिलें. कारण, त्या वेळीं होळकर फार बलिष्ठ झाला असून त्याची समजूत करावी ह्मणून माधवसिंगानें चंद्रावतांचें राज्य त्याला दिलें तरी त्याची समजूत झाली नाहीं, आणि होळकरानेंही तें राज्य गफुरखान ह्मणून त्याचा एक सरदार होता त्यास दिलें. येणेंप्रमाणें रामपूरचें पांचशें वर्षें चालत आलेलें हिंदुराज्य समाप्तीस गेलें.

---

# भाग चौथा.

## लखमसी राणा व अल्लाउद्दीन याची स्वारी.

चितोडची राणी पद्मिनी व तिजमुळें चितोडावर अनर्थप्रसंग.—अल्लाउद्दीनाची निराशा व चितोडावर त्याची दुसरी स्वारी.—चितोडशहर अल्लाउद्दीनानें घेतलें.—चितोड घेतल्यानंतर अल्लाउद्दीनाचीं कृत्यें.—लखमसीचा पुढील वंश व त्याचा नातू हमीर याची हकीकत.— हमीर याच्या आईचे बाललीलाचमत्कार.—हमीराचें पराक्रमदर्शन.—हमीराची कारकीर्द.—हमीराचें मालदेवाचे कन्येबरोबर लग्न.—हमीर बायकोचे साह्यानें चितोड काबीज करितो.—हमीराचा उत्कर्ष आणि त्याला लोकांचें साह्य.—मेवाडच्या लोकांकडे राज्यैश्वर्याचा पुनरागम.—खेतसिंग गादीवर येतो व त्याचा मृत्यु.—लाखा राणा व त्याची कारकीर्द.

लखमसी हा इ० स० १२७५ त राज्यावर बसला. त्या वेळेस पठाण अल्ला-उद्दीन यानें चितोडावर स्वारी करून चितोडचा किल्ला घेतला आणि त्या किल्ल्या-वरील सर्व माणसें निर्दयपणें मारून तेथील सर्व दौलत लुटून नेली. व याचप्रमाणें चितोडच्या लोकांसही फारच उपद्रव दिले. लखमसीचा चुलता भीमसिंग यानें सिंहलद्वीपचा चव्हाण राजा हमीरसिंग याचे पद्मिनी नामक कन्येशीं लग्न लाविलें होतें. या पद्मिनीसारखी सुंदर व गुणी[1] स्त्री सर्व राजस्थानांत नव्हती अशी तिची सर्वत्र प्रख्याति होती. परंतु हें तिचें अपूर्व व अद्वितीय सौंदर्य आणि तिची गुणवत्ता हींच चितोडच्या सिसोदियावंशावर अनेक संकटें येण्यास कारण झालीं. अल्लाउद्दीनाला चितोडावर स्वारी करण्याचें मुख्य कारण हेंच असून त्यानें चितोडास वेढा दिला; आणि असें बोलणें लाविलें कीं, 'पद्मिनीला माझे स्वाधीन करा, ह्मणजे मी चितोडचा वेढा उठवीन. माझें दुसरें कांहीं मागणें नाहीं.' परंतु रजपूत लोकांस आपल्या स्त्रि-यांची अब्रू आणि पावित्र्य रक्षण करण्यापेक्षां अधिक योग्यतेचें व अभिमानाचें कांहींच नसल्यामुळें अल्लाउद्दीनाचें हें बोलणें त्यांस मान्य होण्याचा कालत्रयींही संभव नव्हता व तसेंच शेवटीं अल्लाउद्दीनाच्या अनुभवास आलें. चितोडास वेढा घालूनही ते-थील राजे ऐकत नाहींत, हें पाहून नंतर त्यानें असें बोलणें लाविलें कीं, 'पद्मिनीचें मला दर्शन तरी करवावें. मी तिच्या दृष्टिभेटीखेरीज कांहीं इच्छीत नाहीं.' तेव्हां, 'तिचें प्रत्यक्ष दर्शन तर होणार नाहींच; परंतु आरशांतून तिचें दर्शन घडेल,' असें भीमसिंगाकडून त्याला कळविण्यांत आलें. व तें ह्मणणें त्यानेंही कबूल केलें. नंतर अल्लाउद्दीन चितोडास पद्मिनीच्या दर्शनाकरितां आला व आपला हेतु पूर्ण करून, ह्मणजे आरशांतूनच तरी पण पद्मिनीचें रूपसौंदर्य निरीक्षून, परत निघाला. त्या-वेळीं भीमसिंग हा थोरपणाप्रमाणें अल्लाउद्दीनास आपल्या किल्ल्यावरून चितोडाबा-हेर त्याच्या तळापर्यंत पोंचविण्यास त्याजबरोबर गेला होता. परंतु अल्लाउद्दीनानें

---

१. मनुष्याला प्रत्यक्ष न बघतां त्याचें रूप आरशांतून पाहणे हें चमत्कारिक दिसतें. अल्लाउ-द्दीनासारख्या उल्लू मनुष्याकडून अशी गोष्ट होणें दुरापस्त होय. तेव्हां पद्मिनी तर त्याच्या अ-गदीं दृष्टिआड ठेविली असेल आणि अशा स्थितींत तिचें आरशांत प्रतिबिंब दिसावे कसें? हा प्रश्न येतो. आह्माला तर असें वाटतें कीं, अशा समयीं दर्शनशास्त्रीय रीतीनें तीन आरशांतून पद्मि-नीचें रूप प्रतिबिंबित करून अल्लाउद्दीनास दाखविलें असावें; ह्मणजे, एक आरसा पद्मिनीच्या पुढें तिरपा ठेवून, त्या आरशाचे किरण ज्या बिंदूवर पडत असतील तेथें तसाच दुसरा आरसा तिरपा ठेवून त्यांत त्या आरशांतलें प्रतिबिंब पाडिलें असावें व त्या दुसऱ्या आरशांतील किरणांचें परावर्तन ज्या स्थलावर होत असेल तेथें तिसरा एक आरसा ठेवून त्यांतून पद्मिनीचें रूप अल्ला-उद्दीनानें पाहिलें असावें. या शिवाय दुसरी कल्पना संभवत नाहीं. आणि येणेंकरून पद्मिनीचेंही प्रत्यक्ष रूपदर्शन अल्लाउद्दीनास मिळालें नसेल असें वाटतें.

पूर्वीच व्यवस्था करून ठेविल्याप्रमाणें भीमसिंग आपल्या तळांत आल्याबरोबर त्याच्या लोकांनीं दंगा केला आणि भीमसिंगाचे अंगावर जाऊन तो एकटा पाहून त्यास पकडून कैद केलें. अल्लाउद्दीनानें त्यास असें सांगितलें कीं, 'जर तूं पद्मिनी माझ्या स्वाधीन करशील तर तुझी सुटका होईल.' ही बातमी चितोडास किल्ल्यावर पोहोंचतांच मोठा आकांत झाला. पद्मिनीला याविषयीं विचारिलें कीं, 'तूं मुसलमानांकडे जाऊन त्यांच्या स्वाधीन होण्यास खुषी आहेस काय ?' तेव्हां त्या साध्वीनें सांगितलें कीं, 'पतीच्या बंदमुक्तीकरितां मी तसें करण्यास खुषी आहें.' मग तिच्या माहेरचे गोरा व बादल या नांवाचे सिंहलद्वीपचे दोघे चव्हाण सरदार होते त्यांनीं अशी मसलत केली कीं, पद्मिनीनें स्वतः अल्लाउद्दीनाकडे जाणें तर बिलकुल प्रशस्त नाहीं व आपणही तिला शत्रूंच्या स्वाधीन होऊं देणें बरोबर नाहीं. परंतु अल्लाउद्दीनास असें कळवावें कीं, 'तुझा चितोडाभोंवतालचा वेढा उठवून फौज चालती झाली म्हणजे पद्मिनीस तुजकडे पाठवूं. पण तिचे योग्यतेप्रमाणें ती येईल. म्हणजे, तिचेबरोबर तिच्या दासी व तिची आप्तमंडळी वगैरे तिजबरोबर येईल व त्यांस तुमचेकडून कोणत्याही प्रकारची तसदी होऊं नये.' येणेंप्रमाणें अल्लाउद्दीनास निरोप गेल्यावर तें सर्व म्हणणें त्या कामुकानें अक्षरशः मान्य करून चितोडचा वेढा उठविला. तेव्हां सातशें पालख्या किल्ल्यावरून पद्मिनीला घेतल्याचें मिष करून निघाल्या. या पालख्यांचे पडदे सोडिले असून आंतमध्यें एकेक शूर व हत्यारबंद शिपाई मात्र बसविला होता, ह्याप्रमाणें मोठ्या पडदपोशीनें पद्मिनीच्या व तिच्या जनानखान्याच्या सातशें पालख्या अल्लाउद्दीनाचे गोटानजीक येऊन उतरल्या. आतां पद्मिनी आपल्या हातांत आली, तेव्हां भीमसिंगास घटकाभर त्याचे बायकोबरोबर बोलण्यास व भेटण्यास परवानगी द्यावी, असें पद्मिनीबरोबर आलेल्या मंडळीनें अल्लाउद्दीनाशीं बोलणें लाविलें व त्याप्रमाणें त्यानेंही तें कबूल करण्यास कांकूं केली नाहीं. भीमसिंगास आपल्या बायकोला भेटण्याची पठाणानें परवानगी दिल्यावर भीमसिंग पद्मिनीच्या जनानखान्याचे गोटांत आला. आणि, पद्मिनीला पोहोंचवून कांहीं पालख्या चितोडास परत जावयास निघाल्या होत्या त्यांतील एका पालखींत बसून, तो अल्लाउद्दीनाच्या सैन्यापासून दूर निघून गेला. तों तेथें त्याचेकरितां एक घोडा तयार करून ठेविलाच होता त्याचेवर बसून तो चितोडास सुखरूपपणें दाखल झाला. पद्मिनी हातांत आली तथापि भीमसिंगाला सोडूं नये असा अल्लाउद्दीनाचा बेत होता. कांहीं पालख्या अल्लाउद्दीनाबरोबरच पद्मिनीसहवर्तमान दिल्लीपर्यंत जाण्याचें ठरलें होतें; ह्याप्रमाणें त्या राहिल्या. इतक्यांत अल्लाउद्दीनानें,

भीमसिंगास पद्मिनीला भेटून येण्यास येवढा उशीर कां लागला, ह्मणून भीमसिंगाला बोलावणें पाठविलें. तों कशाचा भीमसिंग! आणि कशाची पद्मिनी! सातशें हत्यारबंद रजपूत वीर एकदम पालख्यांचे पडदे एकीकडे करून बाहेर पडले आणि त्यांनीं एकसारखी कत्तल चालविली. तेव्हां रजपुतांचें आणि मुसलमानांचें घोर रण माजलें. नंतर मुसलमान रजपुतांच्या पाठीस लागून चितोडाचे पायथ्यापर्यंत गेले व तेथेंही मोठी कत्तल उडाली. त्यांत भीमसिंग व पद्मिनी यांची अब्रू रक्षिण्याकरितां बहुतेक प्रसिद्ध शूर लोक मेले.

ह्याप्रमाणें अल्लाउद्दीन आपली मसलत फसली ह्मणून निराश होऊन परत गेला. परंतु त्यानें पुनः चितोड घेण्याची तयारी चालविली (वि० सं० १३४६ ह्मणजे इ० स० १२९०), व शेवटीं चितोडावर चालून आला. इकडे, लक्ष्मणसिंग (लखमसी) यास देवीचा असा स्वप्नदृष्टांत झाला कीं, 'तुझे बारा मुलगे बळी पडतील तेव्हां तुला यश येईल,' असें भाट लोकांच्या कवितेंत वर्णन आहे. नंतर लखमसी यानें तो स्वप्नदृष्टांत दुसरे दिवशीं आपल्या मंत्र्यांस सांगितला. परंतु मंत्रीमंडळी ह्मणाली, 'हें आपल्याला स्वप्न पडलें; यांत विश्वसनीय कांहीं नाहीं.' तेव्हां आणखी कांहीं दृष्टांत होतो कीं काय हें पाहण्याकडे त्याचें लक्ष्य लागलें. तों पुनः त्या दिवशींही पूर्वदिवशींप्रमाणेंच त्याला दिव्याचे मंद प्रकाशांत कांहींएक आकृति दिसून 'मैं भूकी हूं!' असे शब्द स्पष्ट ऐकूं आले. आतां हा जो दृष्टांत झाला हा भाटांच्या क्रमाप्रमाणें त्यांची ती वर्णनलापिका असेल किंवा चितोडच्या रजपूत लोकांस अल्लाउद्दीनाशीं सामना करण्याचा आवेश यावा ह्मणून कोणीं त्या दृष्टांताची बतावणी केली असेल. कांहींही असो. ह्या दुसऱ्या दिवशींच्या दृष्टांतानें मात्र त्याच्या सर्व सरदारांची व मंत्र्यांची खात्री होऊन त्यांची संग्रामाची सिद्धता झाली. लखमसी याचा पहिला मुलगा ऊरसिंग हा गादीवर बसावयाचा व त्या अनुक्रमानेंच एकामागून एक पुत्र गादीवर राज्याभिषिक्त होऊन लढाईला जावयाचे, असा त्यांचा ठराव झाला. त्याप्रमाणें ऊरसिंग गादीवर बसून तसाच रणभूमीवर गेला, व कांहीं वेळ युद्ध होऊन तो धारातीर्थी पडला. ऊरसिंगाचे मागून लखमसीचा दुसरा मुलगा अजयसिंग याची राज्याभिषिक्त होऊन लढाईला जाण्याची पाळी होती. परंतु त्याजवर बापाची फार प्रीति असल्यामुळें त्यानें त्याला, 'तुझे सगळे भाऊ राज्याचें क्षणिक सुख भोगून त्यांची काय विल्हेवाट होते ती बघूं दे आणि नंतर तूं त्या मृत्यूच्या दाढेंत जा,' असें सांगितलें. अजयसिंगानें बापाची वत्सलता आणि सप्रेम विनंति ऐकून त्याप्रमाणें अगोदर आपले इतर बंधूंस आपल्यापुढें जाऊं देण्याचें मान्य केलें. ह्याप्रमाणें अकराही मुलगे युद्धांत बळी पडले, आणि जयाची तर आशा दिसेना.

तेव्हां राणा लखमसी यानें आपल्या सर्व लोकांस भोंवतालीं बोलावून सांगितलें कीं, 'अकराही पुत्रांची रणयज्ञांत आहुति पडली; परंतु यशोलाभाचें कांहीं चिन्ह दिसत नाहीं. तेव्हां आतां जोहार[1] करून काय तो सोक्षमोक्ष करावा, ह्मणजे झालें.' राण्याचें हें ह्मणणें सर्वांनीं कबूल केलें, व त्याप्रमाणें सर्वांची सिद्धता झाली. परंतु त्यापूर्वी त्यांस एक मोठें महत्वाचें आणि परमावधीच्या अभिमानाचें कृत्य करावयाचें होतें. तें कृत्य हें कीं, त्यांना समरयज्ञांत प्रवेश करण्यापूर्वी आपल्या स्त्रीमंडळाचा स्वाहाकार करावयाचा होता. कारण, आपण लढाईंत मेलों तर मागें आपल्या अनाथ विधवा शत्रूंचे हातांत सांपडून त्यांची विटंबना होऊं नये, हा तर त्यांचा मुख्य अभिमान होता. त्याप्रमाणें त्यांनीं त्या स्त्रीमंडळाच्या दहनविधीची सर्व तयारी केली. चितोडकिल्ल्यांत एक विस्तृत गुहा होती तींत लांकडें गोंवऱ्या वगैरे भरून मोठी थोरली चिता प्रदीप्त केली; आणि तींत राण्या, राजकन्या, राजस्नुषा सरदारांच्या व शिपायांच्या बायका व मुली आणि शेवटीं जिच्यामुळें चितोडनगरावर हें अल्लाउद्दीनाचें अरिष्ट आलें ती सौंदर्यखाणी पद्मिनीही शिरून, त्यांनीं आपल्या जातीचा व राष्ट्राचा अभिमान रक्षण करून आपले जीव सर्वभक्ष अग्निनारायणाच्या स्वाधीन केले! ह्याप्रमाणें हजारों स्त्रिया त्या खाइत दग्ध होऊन गेल्या!

स्त्रियांची वाट लाविल्यावर लखमसीनें, आपला निर्वंश न होतां आपल्या पश्चात् कोणी तरी वंशपुरुष असावा ह्मणून, आतां जो एवढाच जिवंत राहिलेला पुत्र अजयसिंग त्यास केळवाड येथें सुरक्षित स्थळीं पाठवून, सर्व मंडळी किल्ल्यावरून खालीं उतरली; व कोणीही जीवाची आशा न धरितां सर्व रजपूत पठाणांचे सैन्यावर जाऊन पडले. किल्ल्यावर एकही प्राणी शिलक राहिला नाहीं. नंतर अल्लाउद्दीनाकडील कित्येक शूर लोक त्यांनीं लोळविले आणि आपण मरून गेले. तेव्हां अर्थात् चितोडचा किल्ला अल्लाचे स्वाधीन झाला. परंतु तेथें जाऊन पाहतो तों त्याला काय दिसलें? सर्व किल्ला ओसाड आणि निर्मनुष्य असून, ज्यामध्यें नुत्तयाच दग्ध झालेल्या हजारों स्त्रियांच्या चितेंतून ज्वाला व धूर निघत होता! असा भयाण देखावा पाहून त्याचें मन उदास झालें. ज्या सुंदरीकरितां एक वेळ मोठा प्रयत्न केला होता ती पद्मिनीही जळून खाक झालेली पाहून तर त्या तार्तरी देशांतल्या विजयी अल्लाउद्दीनास अतिशयच वाईट वाटलें.[2] रजपूत लोकांमध्यें लखमसीचा वरील स्त्रीयशवि-

---

१. रजपूत लोकांत 'जोहार' करण्याचा विधि ह्मणजे अगदीं निदानींचा असतो. जयाची आशा नसली ह्मणजे सर्वांनीं जीवावर उदार होऊन शत्रूवर जाऊन पडावयाचें व त्यांतच आपला अंत करून घ्यावयाचा.

२. 'पद्मिनीची' व 'अल्लाउद्दीनानें चितूर घेतल्याची' ह्या दोन गोष्टी मराठी क्रमिक पुस्त-

धीचा दिवस आणि चितोडकिल्ल्यावरील ती गुहारूप यज्ञवेदी यांस पवित्र असें समजून, तो दिवस आणि ती जागा धार्मिकपणानें पूज्य अशी मानितात. ही स्त्रीसंहारक गुहा अजून असून, असें ह्मणतात कीं, तिचें दार तेव्हांपासून कोणी उघडीत नाहीं. कारण, तेथें एक भुजंग बसला असून कोणी आंतमध्यें दिवा घेऊन गेलें असतां तो भुजंग तो दिवा फुंकितो.[1] अस्तु. वरील गोष्ट इ० स० १३०३ या वर्षी घडली.

अल्लाउद्दीन हा महादुष्ट असून, औरंगजेबासारखा आग्रही व पापी स्वभावाचा होता. त्याला तर असें वाटे कीं, मी जणूं काय दुसरा सिकंदरच आहें. आणि या घमेंडीवरच त्यानें आपल्यास सिकंदर सानी किंवा दुसरा सिकंदर असें ह्मणून त्या नांवाचें नाणें चालू केलें होतें. यानें अन्हिलपूर, पट्टण, धारानगर, अवंतिका (उज्जनी), मंदोड, देवगिरि, वगैरे ठिकाणचीं दरोबस्त राज्यें घेऊन, सोळंखी, प्रमार, परिहार, जाधव, टाक वगैरे क्षत्रिय राजकुळें नाबूद केलीं. त्याचप्रमाणें जसलमीर, गाग्रोन व बुंदी वगैरे ठिकाणें तेथील भाटी, खिची, व हाडा या रजपुतांपासून घेऊन सर्व क्षत्रियांचा नाश केला. या वेळेस मारवाडचे राठोड व अंभेरचे कच्छवाह हे आपले साधारण स्थितींतच होते. तरी त्यांच्याही मागें अल्ला लागलाच होता.[2] अस्तु; अल्लाउद्दीन कांहीं दिवस चितोड येथें राहून त्याला तेथें

---

कांपैकीं पांचव्या पुस्तकांत घेतलेल्या आहेत, तेव्हां त्या आमच्या वाचकांस कांहीं अश्रुतपूर्व नसतीलच. ह्या दोन्हीही गोष्टींचीं वर्णनें आह्मीं येथें थोडक्यांत इतिहासक्रमाच्या अनुरोधानें उतरून घेतलीं आहेत.

१. 'राजस्थानाचा इतिहास' लिहिणारा कर्नल टॉड् साहेब ह्या गुहेविषयीं असें ह्मणतो कीं, मी स्वतः त्या ठिकाणीं गुहेच्या दारापर्यंत गेलो होतों. परंतु आतमध्यें जाण्यास माझें धैर्य होईना. याचें कारण वरील परंपरेची भुजंगविषयक आख्यायिका नव्हे. तर त्या गुहेंत सर्प वगैरे विषारी प्राण्याची वसती असल्याविषयींचीं प्रत्यक्ष चिन्हें दिसत असून तेथील हवा शुद्ध नसल्यामुळें एकदां आंत गेल्यावर बाहेर जिवंत निघण्याची आशाच नाहीं. या गुहेंत अतिशय काळोख असून शेंकडों वर्षे ती मनुष्याच्या वसतीवांचून पडलेली आहे. यामुळें वरील आख्यायिका तशीच पुढें चालली आहे. सरकारानें जरी या गुहेचें शोधन करण्याचें मनांत आणिलें तरी तसें होणें असंभाव्य आहे!

२. इंग्रजींत जसा लॉर्ड डालहौसी इंग्रजी रीतीनें नेटिव्ह् संस्थानें खालसा करण्याविषयीं प्रसिद्ध अभिमानी होता, तसाच मोंगलाईत अल्लाउद्दीन हा त्याच्या पठाणी रीतीनें त्या वेळचीं राज्यें स्वाहा करण्यांत गाजला होता व त्याप्रमाणें त्यानें वरील राज्यें दरोबस्त मोडून टाकिलीं. डालहौसी साहेबांनींही हौशीनें लाहोर, लखनौ, सातारा, नागपूर, अलीबाग वगैरे संस्थानें तळास मिळवून त्यांचा मुलूख इंग्रजीस मिळविला व तेथील अपरिमित संपत्तीची लिलांव केला!

जी कांहीं तोडातोड आणि मोडामोड करावयाची होती ती त्यानें केली. त्यानें तेथील देवळें वगैरे हिंदूंच्या धर्माचीं स्थानें उद्वस्त केलीं; आणि शेवटीं झालोरचा राजा मालदेव याचे ताब्यांत चितोड व तेथील किल्ला देऊन, तो आपला सरदार असें ह्मणून त्याला तेथें नेमिलें व तो दिल्लीस निघून गेला. अल्लानें चितोड येथें तें शत्रूचें स्थान ह्मणून जी नासधूस केली, त्यांत भीमसिंग आणि त्याची रूपवती स्त्री पद्मिनी यांचा महाल मात्र अलग ठेविला. 'यांत त्याचा इतकाच हेतु असावा कीं, तीं उभयतां पतिपत्नी एकभावानें आपलें सत्व संभाळून गत झालीं याबद्दल सन्माननीयता, किंवा पद्मिनी तर आपल्यास अप्राप्त होऊन नष्टही झाली तेव्हां तिचे पश्चात् तिचें स्मारक असा तिचा महाल तरी कायम राखावा, अशी सद्बुद्धि त्यास झाली असावी. कांहीं असो; या संबंधानें अल्लाउद्दीनाचें वर्तन प्रशंसनीय घडलें खरें.

लखमसीच्या पश्चात् चितोडचा खरा वारस अजयसिंग हा केळवाडास सुरक्षित स्थळीं जाऊन राहिला. केळवाड हें मेवाडांत अरवली डोंगराच्या खोऱ्यांत आहे. लखमसीनें जोहारास निघतेसमयीं अजयसिंगास असें सांगितलें होतें कीं, 'तुझीं जेव्हां शंभर वर्षें भरतील—ह्मणजे तूं वृद्ध होऊन राज्य पाहण्यास असमर्थ होशील—तेव्हां, तुझे पश्चात् तुझा वडील भाऊ ऊरसिंह हा प्रारंभीं या लढाईत मेल्यामुळें त्याचे पुत्रास राज्यावर बशीव.' ऊरसिंहाचा हा मुलगा ह्मणजे हमीर होय. हमीराची गोष्ट व त्याचें जन्मवृत्त हीं मोठीं चमत्कारिक आहेत. हमीराचा बाप ऊरसिंह हा एके दिवशीं शिकारीस गेला असतां एका रानडुकराचे पाठीस लागला. तों तो डुकर एका उभ्या जोंधळ्याच्या शेतांत शिरला. हें पाहून त्या शेताचे मालकाच्या मुलीनें तेथील एक पांच सहा हात लांबीचें जोंधळ्याचें ताट मोडून घेऊन त्यानें त्या डुकरास ढोंशीत ढोंशीत बाहेर काढिलें. त्या डुकराचे पारधी ऊरसिंह वगैरे यांची दृष्टि त्या शिकारीवर होती व ती शिकार त्या शेतांत अदृश्य झाल्यामुळें ती बाहेर कशी निघेल ह्मणून ते टेहळीत होते, तों ही शेतकऱ्याची मुलगी आपल्या जोधळ्याच्या ताटाचे भाल्यानें त्या डुकराला टोंचीत टोंचीतच बाहेर निघाली. हें त्या मुलीचें धैर्य बघून ऊरसिंहास मोठा चमत्कार वाटला. पुढें, ही शिकारी मंडळी त्याच शेताचे आसपास जेवणाखाण्याची तयारी करीत असून ऊरसिंह वगैरे त्या मुलीच्या अपूर्वधारिष्टाच्या गोष्टी बोलत बसले असतां, ही मुलगी शेतावरलीं पांखरें वगैरे उडवीत असून तिच्या गोफणगुंड्याचा एक दगड जो सुटला तो ऊरसिंहाचे घोड्याच्या एका पायास लागून तो पाय दुखावला. हें अरिष्ट पाहून हा धोंडा कोणीकडून आला ह्मणून बघतात तों तीच मुलगी शेतांतल्या माळ्यावर उभी राहून गोफणगुंडा फिरवीत आहे असें दिसलें. तेव्हां हा धोंडा तिच्याकडूनच

आला असावा असा त्यांनीं तर्क बांधिला. पुनः तीच मुलगी दुधाची चरवी डोक्यावर घेऊन हैस हांकीत हांकीत घराकडे चालली असतां ऊरसिंहानें मुद्दाम तिला धक्का देऊन तिची चरवी पाडण्याकरितां आपल्या टोळींतील एका मित्रास त्याचा घोडा तिजजवळून नेण्यास सांगितलें. तों त्या वस्ताद मुलीनेंच आपली हैस त्या घोडेस्वाराचे अंगावर घातली; तेव्हां तो स्वार घोड्यावरून खालीं पडला. असें त्या मुलीच्या धैर्यशौर्याचे चमत्कार बघून त्या तरण्या राजपुत्रानें (ऊरसिंहानें) त्या मुलीच्या बद्दल चौकशी केली. त्या वेळीं त्याला समजलें कीं, ती रजपूत जातींतीलच चव्हाण वंशापैकीं चंदाना या शाखेची एका गरीब मनुष्याची मुलगी आहे. नंतर दुसरे दिवशीं राजपुत्र पुनः त्याच शेतांत आला. आणि त्यानें तिच्या बापास बोलावून आणून, 'तुझी मुलगी मला बायको करण्यास दे,' अशी त्याजजवळ तिची मागणी केली. तो बापही विलक्षण उद्धट होता. राजपुत्रानें त्याला बोलावून आणिलें, तों तो कांहींएक नम्रतेचें चिन्ह न दाखवितां ऊरसिंहाला लगटून बसला, यामुळें राजपुत्राच्या सोबत्यांस मोठाच चमत्कार वाटला. परंतु यापेक्षांही विशेष चमत्कार हा वाटला कीं, राजपुत्रानें त्याची गरीबी किंवा योग्यता मनांत न आणितां त्याच्या कन्येबद्दल मागणी केली, तरी ती त्यानें निखालस नाकबूल करून, 'मी माझी मुलगी तुह्मास देणार नाहीं,' असें ऊरसिंहाला उत्तर दिलें ! परंतु, पुढें असें झालें कीं, त्यानें ती हकीकत आपल्या बायकोस सांगितली. तेव्हां तिनें, 'असें चांगलें स्थल अनायासें आलें असतां दवडिलें कां ?' ह्मणून ह्मटल्यावर, तिच्या सांगण्यावरून तो पुनः राजपुत्राकडे आपण होऊनच आला; आणि 'पूर्वी नाकारलेली गोष्ट मला मान्य आहे व मी माझी मुलगी आपल्यास देतों' असें ह्मणून, त्यानें ती मुलगी ऊरसिंहास दिली. अशा या पराक्रमी चंदाना रजपुताणीचा हमीर हा मुलगा असून तो लहानपणीं आजोळींच असे. ह्या वेळीं ह्मणजे चितोडच्या घराण्याचें व वैभवाचें उच्चाटन झालें त्या वेळीं त्याचें वय सुमारें बारा वर्षांचें होतें. मामाच्या घरीं असतां तो भला दांडगा व द्वाड असा बनला होता.

सर्व मेवाडांत दिल्लीचे (मोंगलाकडील) शिपाई व स्वार जिकडे तिकडे रक्षणार्थ ठेविले असल्यामुळें, अजयसिंगास वर डोकें काढण्यास अवकाशच मिळेना. तेव्हां त्याला डोंगरी व रानटी लोकांमध्येंच रहावें लागलें. त्यांतच त्या लोकांचा मुंजा भील ह्मणून एक मुख्य होता, त्याशीं अजयसिंगाची कांहीं कारणावरून कलागत झाली. व त्या भांडाभांडींत मुंजानें अजयसिंगाचे मस्तकावर वार केला. त्या वेळीं अजयसिंगाचे दोघे मुलगे सज्जनसिंग आणि अजिमसिंग या नांवाचे अनुक्रमें १६ व १४ वर्षांच्या वयाचे होते, व हा त्यांचा, आपले पराक्रम दाखविण्याचाच काळ

असून ते बापाबद्दलचा सूड घेण्याकरितां मुंजा भीलाशीं झुंजत होते. तेव्हां त्यांनीं आपल्या साह्याला हमीर यासही बोलाविलें. हमीर येऊन ह्मणाला, 'मी एकटा त्या मुंजावर जाऊन त्याचें डोकें कापून आणितों, नाहीं तर तोंड दाखविणार नाहीं.' आणि तो अशी प्रतिज्ञा गाऊन गेल्यासारखा त्याप्रमाणें त्यानें मुंजाचें मस्तक तोडून तें घोड्याच्या खोगीरास अडकवून चुलत्याकडे आणिलें. हमीर तें मस्तक अजयसिंगापुढें ठेवून ह्मणाला, 'काका, हें पहा आपल्या शत्रूचें शिर!' पुतण्याचे हे शब्द ऐकून अजयसिंगाला मोठी धन्य झाली. त्यानें त्याचें मोठ्या प्रेमानें चुंबन घेऊन त्याच शत्रुशिराच्या रक्ताचा त्याचे कपाळीं टिळा लाविला, आणि त्याला सांगितलें कीं, 'तुझ्या कपाळींच राज्यवैभवाचें सुख भोगण्याचें लिहिलें असल्यामुळें माझे पश्चात् तूंच राजा हो.' अजयसिंगाच्या या सांगण्यावरूनच त्याच्या दोघां मुलांची व्यवस्था समजली; ह्मणजे, त्यांस राज्याधिकार वगैरे कांहीं नसून त्यांनीं हमीराच्या ताब्यांत रहावें असें झालें. परंतु पुढें अजिमसिंग वारला व सज्जनसिंग राहिला. तेव्हां त्यानें हमीराशीं तंटा वगैरे करूं नये ह्मणून अगोदरच अजयसिंगानें त्याला मेवाडांतून बाहेर जाण्यास सांगितलें. नंतर तो सज्जन व पितृभक्त सज्जनसिंग बापाच्या आज्ञेप्रमाणें मेवाडदेश सोडून जो निघाला तो दक्षिणेकडे येऊन राहिला. या सज्जनसिंगाचे वंशांतच पुढें शिवाजी महाराज उत्पन्न झाले; असें मेवाडच्या इतिहासांत लिहिलें आहे.[1]

शहाबुद्दीनाचे वेळेस हिंदुस्थानांतून क्षत्रिय चक्रवर्ती राजे नाहींसे झाल्यावर एक शतकपर्यंत क्षत्रिय राजवंशांची कोठेंही स्थिरता नव्हती. तों इ० स० १३०१ मध्यें हमीर यास राज्यवैभवाचा टिका लागला व त्याप्रमाणें त्यानें ६४ वर्षें राज्योपभोग भोगिला. दक्षिणेकडे जो पुढें शिवाजी महाराजांचा क्रम चालला होता तोच क्रम हमीर याणें आपल्या काळीं चालविला होता. अल्लाउद्दीनानें चितोडास मालदेवाची स्थापना केली होती व त्याप्रमाणें तो चितोडचें राज्य करीत होता. परंतु इकडे हमीराचा लुटालुटीचा व दंगे माजविण्याचा क्रम चालला होता. त्याच्या जागोजाग टोळ्या फिरत असून त्यांणीं जाण्यायेण्याच्या वाटा बंद पाडिल्या होत्या.

---

१. महाराष्ट्र देशांतील छत्रपति शिवाजीमहाराजांची मूळपीठिका मेवाडच्या इतिहासांत पुढें लिहिल्याप्रमाणें आहे:—मूळ पुरुष अजयसिंग, त्याचा सज्जनसिंग, व पुढें अनुक्रमे दिलीपसिंग, शिवाजी, भोराजी, देवराज, उग्रसेन, मालोजी, खेलोजी, जनकोजी, सटवाजी, शाहाजी आणि त्याचा प्रसिद्ध शिवाजी. शिवाजीच्या पुढें संभाजी, शाहू, रामराजा, दुसरा शाहू, प्रतापसिंह आणि शेवटचा शाहाजी. येथें या घराण्याचें राज्यवैभव संपलें. नेपाळांत जो हल्लीं राजवंश आहे तोही शिवाजीच्या वंशाप्रमाणेंच चितोडच्या राजघराण्याशीं संबद्ध आहे.

हमीराचा उपद्रव चितोड शहर व किल्ला येथें मात्र कांहीं झाला नाहीं. बाकी सर्व देश त्याणें पादाक्रांत करून टाकिला. हमीर हा केळवाड्यासच राहत असे व तेथेंच त्याणें आपलें सैन्य जमविलें. केळवाड हें गांव डोंगरांमध्यें असल्यामुळें स्वाभाविकच निर्भय स्थल होतें व तेथें गुरांढोरांस चारापाणी विपुल मिळे. हमी-राजवळ पांच हजार भील तीरकमठे घेऊन नेहमीं सज्ज असत. हमीर हा स्वतःच गुणी व शूर असल्याची कीर्ति असल्यामुळें पुढें चितोडचा नामधारी राजा मालदेव याणें त्यास आपली मुलगी देण्याचें योजिलें. ही मुलगी हमीरानें करूं नये असें त्याच्या मसलतगारांचें ह्मणणें होतें. परंतु त्याणें त्यांचें कांहीएक न ऐकतां ती मु-लगी बायको करण्याचें पतकरिलें. त्यास मसलतगार ह्मणत कीं, आपल्याला माल-देव हा आपली मुलगी देतो आहे यांत कांहीं तरी त्याचा दुष्ट हेतु असून, येणेंकरून आपला खास घात होणार आहे; अथवा, ही मुलगी देऊन आपला एकप्रकारें तो अपमान करीत आहे हें तरी खचित आहे. कारण, चितोडची गादी आपली असून आपण तिजपासून भ्रष्ट झालांत व दूर एका गांवांत राहतां, आणि मालदेव हा मोठ्या डौलानें आपल्या राजधानींत राहून स्वतंत्रपणें राज्य भोगितो आहे; हें आपल्यास जाणविण्याकरितां हें कन्यादान एकप्रकारानें आपल्या पाणउताऱ्यास कारण होणार आहे'. परंतु त्यांचे ह्मणण्याकडे त्याणें मुळींच लक्ष्य दिलें नाहीं. तो ह्मणाला, 'या संबंधांत घातपात होण्याचें मला तर कांहीं चिन्ह दिसत नसून, मालदेवाची मुलगी केली तर त्यांत अपमान किंवा पाणउतारा झाला असें मानण्याचेंही कांहीं एक प्रयोजन नाहीं. तर उलट, या शरीरसंबंधानें आपलें नगरही कदाचित् आपल्याला मिळण्याचा संभव आहे'. तो आणखी ह्मणाला, 'रजपुतानें नेहमीं धोक्याचीं व संकटाचीं कामें अंगावर घेण्यास सज्ज असलें पाहिजे. एकेदिवशीं त्याणें जखमांनीं छिन्नविच्छिन्न होऊन पडलें पाहिजे, व दुसरे दिवशीं सिंहासनारूढ होऊन छत्रचामरादि राजचि-न्हांनीं विराजित झालें पाहिजे.' हमीराचें लग्न चितोडच्या किल्ल्यावर व्हावयाचें असून त्याणें आपल्याबरोबर लवाजम्याचे फक्त पांचशें घोडेस्वार घेऊन चितोडास यावें असें ठरलें होतें. त्याप्रमाणें तो आपल्या लोकांसहवर्तमान चितोडाजवळ जा-ऊन पोहोंचला. तेथें मालदेवाचे पांच मुलगे त्याला सामोरे आले होते ते त्यास भे-टले, व ते सर्व मिळून शहरच्या दरवाज्याशीं आले; तों तेथें विवाहमंगलकार्याचें दर्शक असें कांहींच चिन्ह दिसलें नाहीं. अशा वेळीं रजपूत लोकांच्या चालीप्रमाणें नगरद्वारावर तोरणें वगैरे बांधावयाचीं असतात; त्याप्रमाणें कांहीं एक व्यवस्था हमी-राचे दृष्टीस पडली नाहीं. तेव्हां त्याला, यामध्यें कांहीं तरी कपट आहे असें वाटलें. तथापि त्याबद्दलची भीति किंवा खेद बिलकूल न दाखवितां तो तसाच किल्ल्यावर

चढून गेला. तेथें गेल्यावर त्याच्या पूर्वजांचा जो दिवाणखाना होता त्यांत त्याला नेलें. तेथें त्याचें स्वागत करण्यास खुद्द राव मालदेव व त्याचा थोरला मुलगा बनबीर असे उभे होते. मोठ्या सत्कारानें व नम्रतापूर्वक वराचें स्वागत झाल्यावर त्याच ठिकाणीं वधूला आणिलें आणि तिच्या बापानें तिला हमीराच्या हातांत दिलें. या प्रसंगीं हा विधि करण्याचे जे संस्कार व्हावयाचे किंवा मंत्र तंत्र वगैरे ह्मणावयाचे असतात त्याप्रमाणें कांहीं एक केलें गेलें नाहीं. वधूवरांच्या पदरांना गांठ मारून वधूचा हात वराचे हातांत दिला आणि हें विवाहकार्य आटोपलें! हा सर्व प्रकार बघून हमीर विशेष अस्वस्थचित्त झाला; परंतु त्याला वधूपक्षीय कुलोपाध्यायानें शांतता धरण्याविषयीं विनंति केल्यावरून तो तसाच दम धरून राहिला. नंतर हमीर आपल्या या नववधूस घेऊन, त्यांजकरितां जो महाल तयार करून ठेविला होता, तेथें गेला. तेथें गेल्यावर तिच्या सप्रेम आणि आस्थापूर्वक वर्तनानें हमीराची दुर्मुखता नाहींशी होत चालली. परंतु, हा सर्व विलक्षण प्रकार होण्याचे कारणाचा तिजजवळ तपास करितां, त्याला समजलें कीं, ही वधू विधवा होती. तिचा प्रथम विवाह भाटी जातीच्या एका रजपूत संस्थानिकाशीं झाला होता, परंतु तो लग्न झाल्यावर लौकरच एका लढाईंत मारला गेला. तिचें तें लग्न झालें तेव्हां ती अगदीं अल्पवयी असून तिला त्याचें रूप देखील आठवत नव्हतें. ही सर्व हकीकत ऐकून हमीरास एकप्रकारें मालदेवानें आपल्यास फसविलें व या विधवाकन्यादानानें आपला अपमान केला असे वाटूं लागलें. परंतु, त्याच्या मुद्रेवरून ह्या सर्व गोष्टी त्या चाणाक्ष वधूनें समजून त्याचें तिणें फार चांगल्या रीतीनें समाधान केलें. ती ह्मणाली, 'माझें आपण पाणिग्रहण केलें यांत आपला कांहीं तोटा झाला असें वाटूं देऊं नये. माझ्याशीं आपला संबंध झाला हा कदाचित् आपलें नष्टवैभव फिरून मिळविण्यासही उपयोगी पडेल.' ह्याप्रमाणें तीं पतिपत्नी खऱ्या प्रेमानें आपली संसारयात्रा क्रमण्यास सिद्ध झालीं. नंतर सुमारें पंधरा दिवसांनीं हमीर आपल्या पत्नीसह केळवाड्यास परत आला. पुढें थोडेच दिवसांनीं हमीराला मुलगा झाला. त्याचें नांव खेतसिंग असें ठेविलें. पुढें हमीराच्या बायकोनें चितोडच्या फौजेंत फितूर करून हमीरास त्याच्या सैन्यासहवर्तमान चितोडावर नेलें आणि चितोड आपल्या ताब्यांत घेतलें. त्या वेळीं मालदेव हा मेर लोकांवर गेला असल्यामुळें तो व त्याचे अभिमानी सरदारही चितोडास नव्हते व यामुळें अनायासेंच हमीराला सासऱ्यास किंवा तत्पक्षीयांस प्रत्यक्ष न दुखवितां चितोडचा ताबा घेतां आला व तो आपले पूर्वजांचे राजमंदिरांत विराजमान झाला.

पुढें, मालदेव ज्या स्वारीला गेला होता तिकडून परत येऊन पहातो तों सर्वच

फेरबदल होऊन गेलेली त्याचे दृष्टीस पडली. तेव्हां तें सर्व वर्तमान सांगण्याकरितां तो स्वतः दिल्लीस गेला. तेथें अल्लाउद्दीनाचे मागून माहमूद खिलजी हा तख्तावर बसला होता. त्याणें हमीराचें हें कृत्य ऐकून आपली फौज तयार केली आणि ती घेऊन तो स्वतः हमीराचा समाचार घेण्यास निघाला. परंतु इकडे लोकांस हें वर्तमान कळल्याबरोबर हमीराला चोहोंकडील हिंदुसंस्थानिकांची मदत येऊन पोहोंचली. सर्वांसच त्या रानटी मोंगलांचा अम्मल नकोसा झाल्यामुळें, हमीर चितोडच्या गादीवर परत आला म्हणून परमानंद झाला होता आणि याकरितांच जो जो म्हणून हिंदु होता त्याणें त्याणें होईल तितकी हमीरास मदत केली; यामुळें हमीराचें सैन्य फारच बलाढ्य झालें. शेवटीं माहमूद खिलजी आणि हमीर यांचें चंबळा नदीवर सिंगोली येथें युद्ध होऊन माहमूदाचा सर्वांशीं पराजय झाला व तो हमीराचे हातांत कैदी होऊन सांपडला. तो हमीराचे ताब्यांत चितोड येथें तीन महिने सक्त कैदेंत होता. नंतर त्याणें हमीरास अजमीर, रणथंबोर, नागोर व सुईसोपूर हे प्रांत, पन्नास लाख रुपये, आणि शंभर हत्ती इतकी खंडणी देऊन आपली सुटका करून घेतली. त्याची सुटका करतेवेळीं हमीरानें त्याजपासून, 'पुनः अशा स्वाऱ्या करून आपल्याला व आपल्या लोकांना संकटांत व खर्चांत घालणार नाहीं इतकेंच नाहीं, तर अशा प्रकारच्या स्वाऱ्या दुसऱ्या कोणीं हमीरावर किंवा त्याचे आसपासच्या मुलखावर केल्यास त्यांमध्यें माहमूद खिलजीनें साह्यास आलें पाहिजे,' असा त्याजकडून करार लिहून घेतला.[१]

हमीराचे रणभीर आणि बनबीर असे दोघे मेहुणे असून ते माहमूद खिलजीच्या पक्षाचे होते. त्यांपैकीं वरील लढाईंत रणभीर मारला गेला व बनबीर माहमूदाबरोबरच पकडला गेला. पण पुढें त्यास बंधमुक्त करून हमीरानें त्याला निमच, जीरण, रतनपूर वगैरे महाल देऊन सांगितलें कीं, 'तुझें माझें आप्तत्व एकीकडे ठेविलें तरी, मी तुझ्या धर्माचा व जातीचा असल्यामुळें तुला हिंदुराजाचा व राज्याचा अभिमान असूं दे. तूं मोंगलांकडे फितूर होऊन आपल्याकडे अधमपणा

---

१. प्रसिद्ध मुसलमान इतिहासलेखक फेरिस्ता याणें वरील विजयाची हकीकत आपल्या इतिहासांत मुळींच दिली नाहीं. परंतु खिलजी घराण्यापासून चितोड सोडविलें ही गोष्ट सत्य आहे, ती मिथ्या होऊं शकत नाहीं, तेव्हां तद्देशीय भाट वगैरेंनीं जें लिहून ठेविलें आहे व जीं वर्णनें ते गातात तीं खोटीं आहेत असें कदापि म्हणवत नाहीं. आम्हीं पूर्वी, मुसलमान इतिहासलेखकांचा पक्षपात जो लिहिला आहे त्याचें हें ढळढळीत उदाहरण होय. कित्येक इतिहासलेखकांमध्यें सत्यगोपन आणि पक्षपात हे मोठे दुर्गुण असून त्यांच्यापासून आपण जें फळ इच्छितों तें प्रामाणिकपणानें मिळत नाहीं, ही मोठ्या दुःखाची आहे !

आणि सर्व लोकांत नाचक्की आणून घेऊं नकोस.' हमीर हा चितोडचा राजा झाल्यापासून सर्व हिंदूंना मोठें भूषण वाटूं लागलें; व भोंवतालच्या हिंदुसंस्थानिकांस मोठा आश्रय आणि पाठिंबा वाटूं लागल्यामुळें ते सर्व हमीरास हरएक प्रकारचा सन्मान, खंडण्या आणि भेटी देऊं लागले. बुंदी, ग्वाल्हेर, चंदेरी, रायसहन, सिक्री, काल्पी, अबू वगैरे ठिकाणचे ठाकूरलोक हमीरास भेटून त्यास मिळाले व जयपूर, जोधपूरचे ठाकूर आत्मखुषीनें त्याचे मांडलिक झाले.

मोंगल लोकांचा ताग होण्यापूर्वी मेवाडच्या राजाचा मुलूख फार मोठा होता; परंतु आलीकडील दोनशें वर्षांत तो सर्व मोंगलांनीं काबीज करून घेतला होता. हल्लीं तर चितोडास हमीर हा मोठा पराक्रमी आणि कुलदीपक राजा होऊन त्याणें आपलें गतवैभव फिरून सर्व मिळविण्याचा निश्चय केला; व त्याला हा आपला हेतु सिद्धीस नेण्यास कालही तसाच अनुकूल मिळाला. सर्व लोकांचें त्याजवर प्रेम व त्याला साह्य असल्यामुळें त्याला कोणतीही गोष्ट अशक्य नव्हती. तशांतच दिल्लीस खिलजी, लोदी आणि सूर या तीन मोंगल घराण्यांचीं आपआपसांतच भांडणें चाललीं. त्यांमध्यें, ज्या घराण्याची सरशी होई त्याणें तख्तावर बसावें, असा क्रम चालल्यामुळें लोकांमध्यें अस्वास्थ्य फार वाढत चाललें होतें. अशा संधीस चितोडगडच्या राजास (हमीरास) आपला फायदा करून घेण्यास चांगलें फावलें. त्याच्या फौजा तयार होऊन दिल्ली, सौराष्ट्र व मारवाडांत नागोरपर्यंत जाऊन विजय संपादून आल्या. ह्या वेळीं हमीराच्या लोकांनीं जी संपत्ति आणि ऐश्वर्य संपादन केलें होतें त्याचें दर्शक अशा मेवाडांतल्या भव्य भव्य व सुंदर इमारती आणि त्याजवरचीं कामें पाहिलीं ह्मणजे समजतें. मेवाडच्या येवढ्या मोठ्या फौजांचे खर्च चालून इमारतींमध्यें इतका पैसा घालण्यास त्यांजवळ शिलक तरी कोठची होती व इतका पैसा त्यांणीं आणिला कोठून याचें मोठें आश्चर्य वाटतें. बरेच दिवसपर्यंत जे त्यांणीं दारिद्र्य आणि पारतंत्र्यजन्य दुःख भोगिलें होतें त्याचा सर्व वचपा ह्या कुशल व पराक्रमी हिंदु राजाचे कारकीर्दीत लोकांनीं काढून घेतला. चितोड येथील राजघराणें पहिल्यापासूनच कलाकौशल्यास आणि कारागिरीस उत्तेजन देण्याविषयीं प्रसिद्ध असून हल्लींच्या सर्वमान्य, शांत आणि न्यायी राज्यपद्धतीनें लोकांची भरभराट फार वाढत चालली होती. यामुळें त्यांना पैशाची ह्मणून तूट पडली नाहीं. ह्याप्रमाणें हमीर पुष्कळ दिवस राज्यसुख भोगून व मागें चिरकाल आपलें नांव राहील अशा रीतीनें वागून वृद्धावस्थेंत योग्यकालीं मरण पावला. सर्व मेवाडांत आबालवृद्ध त्याजविषयीं प्रेम आणि पूज्यबुद्धि बाळगीत होते. त्याचे महापराक्रमानें त्याच्या मागें त्याच्या पुत्रास फार मोठें ऐश्वर्य आणि राज्य मिळालें.

हमीराचा मुलगा खेतसिंग हा वि० सं० १४२१ ह्मणजे इ० स० १३६५ मध्यें आपल्या बापाचे मागें चितोडच्या गादीचा स्वामी आणि मेवाडांतील विस्तृत राज्याचा मालक झाला. तोही बापासारखाच पराक्रमी आणि प्रजाहितचिंतक होता. त्याणेंही मांडलगड वगैरे नवीन प्रांत आपल्या राज्यास जोडिले. त्याचप्रमाणें त्याणें दिल्लीच्या हुमायून बादशाहावर बाकरोल येथें जय मिळविला. परंतु पुढें तो बनौडा येथील हाडिया जातीच्या रजपूत संस्थानिकाचे कन्येबराबर लग्न करण्याच्या विचारांत होता तों त्या संस्थानिकानेंच त्याला मारून टाकिलें.

खेतसिंगाचे मागें लाखा राणा चितौडचे सिंहासनावर आला. खेतसिंगानें सुमारें १८ वर्षें राज्य केलें होतें. ह्मणजे, तो वि० सं० १४३९ अथवा इ० स० १३८३ या सालीं मारला गेला; व लागलाच लाखा राणा हा मेवाडचा राजा झाला. तोही पराक्रमी, कलाकौशल्योत्तेजक आणि उत्कृष्ट राजपद्धतीनें वागणारा असा होता. त्याणें प्रथमतः मेरवाडचे डोंगरी किल्ले काबीज करून घेतले व त्यांत वैराट नांवाचा जो घातुक किल्ला होता तो मोडून टाकिला. त्याणें महंमद लोदीचा पराभव केला. इतर मुलूख काबीज करून, आपली राज्यसीमा वाढविण्यांत जो फायदा आहे त्याचेपेक्षांही ज्या सधनतेंत आणि ऐश्वर्यांत विशेष नैरंतर्य आहे अशा प्रकारचे नवीन मार्ग आणि शोध काढण्याचा क्रम त्याणें चालविला. हे मार्ग आणि शोध ह्मणजे धातूंच्या खाणी हुडकून काढावयाच्या. व त्याप्रमाणें जावडा येथें रुप्याच्या व कथलाच्या खाणी तर त्याणें काढिल्याच. या खाणींपासून त्याला पुष्कळ पैसा मिळाला व तें एक निरंतरचेंच उत्पन्न झालें होतें. त्याणें देशांत कलाकौशल्य पुष्कळ वाढवून आपल्याला 'देशहितचिंतक' असें नांव मिळवून घेतलें. त्याणें राज्याचे संरक्षणार्थ किल्ले कोट बहुत बांधून लोकांच्या सोयींकरितां तळीं, कुंडें, वगैरे बांधून प्रजेला फार सुख दिलें. खाणींच्या उत्पन्नानें त्याजवळ पैसा पुष्कळ वसूल होऊन त्याच्या योगानें पूर्वी अल्लाउद्दीनाच्या धिंगामस्तींत जीं राजगृहें व राजमंदिरें मोडून तोडून उद्ध्वस्त झालीं होतीं तीं सर्व बांधण्यास त्याला सामर्थ्य आलें. त्याच्या स्वतःच्या वाड्याचा कांहीं भाग अद्यापि आहे, व तो चितोड येथील रत्नमंदिर व पद्मिनीमहाल या इमारतींच्या तोडीचाच व तशाच शिल्पकामाचा आहे. त्याणें बांधिलेलें विश्वकर्मा(ब्रह्मदेव)मंदिर ह्मणून एक देऊळ अजून जसेंच्या तसेंच आहे.

लाखा राण्याला संतति पुष्कळ होती. त्यांत चोंडा व मोकल हे ज्येष्ठ व कनिष्ठ मुलगे होते. त्याच्या मागून त्याचा कनिष्ठ मुलगा मोकल हाच गादीवर बसला. याचें कारण व लाखा राण्याच्या कारकीर्दीतल्या विशेष गोष्टी पुढील भागांत सांगूं.

---

# भाग पांचवा.

## मोकल राणा.

रजपुतांची स्त्रियांविषयीं कडक बुद्धि.—चोंडा याचा गैरसमज आणि लाखा राण्याचा नवीन विवाह.—मोकल याचा चितोडचा राज्याभिषेक.—चोंडा याचा राज्यकारभार व सापत्न मातेचें वितुष्ट.—चोंडा निघून गेल्यानंतर चितोड येथील व्यवस्था.—रघुदेवाचा रणमल्लाकडून वध. रघुदेवाच्या वधानें राणीच्या विचारांची बदल.—चोंडाचें राजकारस्थान.—राणीचें चोंडाच्या मसलतीनें वागणें.—रणमल्लाचे पक्षाच्या लोकांची कत्तल.—रणमल्लाचा बेफामपणा आणि त्याचा अंत.—चोंडा मंदोड घेतो.—जोधा मंदोडचा कबजा पुन: मिळवितो.—मोकल याजकडे राज्यकारभार येतो व त्याची कारकीर्द.—त्याचा निष्कारण वध.—मारेकरी चचा व मेरा यांचा पाठलाग.—चचा व मेरा यांचा अंत.

सर्व सुधारलेल्या राष्ट्रांत स्त्रीसंबंधाची करडी नजर, त्यांच्या अंतर्बाह्य स्थितीचा नाजूकपणा आणि त्यांचेविषयीं न्यायनैष्ठुर्य हींच विशेष महत्वाचीं, आणि अशी जेथें महत्वी असेल तेंच उत्तम राष्ट्र, असें मानण्याचा जर प्रचार पडला, तर त्या संबंधानें रजपूत लोकांचें राष्ट्र पहिल्या प्रतीला येईल ! स्त्रियांविषयीं कोणाचा वांकडा डोळा, त्याचेविषयीं साधारण बोलण्यांत विनोद, किंवा त्यांच्या पावित्र्याविषयीं आणि शुद्धपणाविषयीं यत्किंचित् संशय, हे प्रकार रजपूत लोकांत अगदीं सहन व्हावयाचे नाहींत. याजबद्दलचीं उदाहरणें रजपुतांच्या इतिहासांत पुष्कळ आहेत. त्यांपैकींच या खालीं प्रस्तुत प्रसंगास आलेली गोष्ट लिहावयाची आहे.

पूर्वभागांत लाखा राण्याच्या मागून त्याचा धाकटा मुलगा मोकल हा गादीवर बसला इतकें मात्र लिहिलें व त्याजबद्दलची हकीकत या भागांत देऊं ह्मणून ह्मटलें, ती हकीकत येथें देतों. कोठेंही वडील मुलगा बापाचे मागून राज्याचा वारस होतो अशी रीति असून ती रीति रजपूत लोकांमध्यें तर चांगल्या रीतीनें चालू होती. असें असून, व लाखा राण्याचे मागून त्याचा वडील मुलगा चोंडा हा जिवंत असतां, तो गादीवर न बसतां त्याचा धाकटा व सावत्र भाऊ गादीवर बसला हें चमत्कारिक होय; ह्मणून त्याची हकीकत येथें द्यावयाची आहे.

लाखा राणा उतारवयाचा होत चालला होता. त्याचीं मुलें मोठालीं व नांदतीं होऊन त्यांसही मुलेंबाळें झालीं होतीं. अशा समयीं एके वेळीं मारवाडचा राजा रणमल्ल याणें लाखा राण्याकडे नारळ पाठवून, युवराज चोंडा यास आपली कन्या देण्याचें बोलणें करण्याकरितां आपला मनुष्य पाठविला. हा मारवाडचा वकील आला तेव्हां युवराज चोंडा तेथें नसून वृद्ध लाखा राणा आपल्या दरबारांत मुत्स-

ह्रीमंडळीसह बसला होता. वकील आल्यावर त्याचा आदरसत्कार वगैरे करावयाचा त्या रीतीनें राजानें केला व वकीलास येण्याचें कारण विचारिलें. वकीलानें मोघम सांगितलें कीं, 'आमच्या राजेसाहेबांची कन्या उपवर झाली आहे, तिचा स्वीकार व्हावा ह्मणून नारळ घेऊन बोलणें करण्याकरितां आलों आहें.' उपवर मुलगी, अर्थात् आपल्या मुलाकरितांच आली आहे, हें वकील जरी बोलला नाहीं तरी राजा समजला. व बोलतां बोलतां विनोदानें मिशांवर हात फिरवून ह्मणाला, 'बरें आहे. तुमचा नारळ चोंडा आला ह्मणजे तो घेईल. आह्मासारख्या ह्मातान्या मनुष्यांस कोण असे नारळ देणार आहे?' राजाचें हें भाषण ह्मणजे कांहीं कपटाचें नसून थट्टेचें होतें. व तें ऐकून दरबारांतल्या मंडळींतही हंशा उडाला. परंतु हा विनोद चोंडाच्या कानावर गेल्यावर तो त्याला न आवडतां, जिच्याविषयीं बापाची आसक्तबुद्धि आहे ती आपल्याला बायको नलगे, असें ह्मणून त्याणें तो नारळ घेण्याचें सर्वांशीं नाकारिलें. त्याच्या या विलक्षण समजुतीबद्दल त्याला पुष्कळांनीं व खुद्द राजानेंही सांगितलें. तथापि, त्याणें ह्मणून तो नारळ स्वीकारिला नाहीं. शेवटीं, आपल्या वंशांतच मुलगी द्यावयाची असा मारवाडच्या राजाचा आग्रह असल्याबद्दल वकीलाकडून कळलें, तेव्हां राजा चोंडा यास ह्मणाला कीं, 'जर तूं ही आग्रहपूर्वक आलेली वधू करीत नाहींस आणि मींच तिच्याशीं लग्न करावें असें ह्मणतोस तर, या मुलीच्या पोटीं होणाऱ्या माझ्या मुलास जर तूं राज्याचा वारस होऊं देशील तर मी तिच्याबरोबर लग्न लावीन.' बापाचें हें बोलणें चोंडानें कबूल करून, त्याप्रमाणें, 'मी आपल्या मागें गादीवर वारसा सांगणार नाहीं' ह्मणून त्याणें एकलिंगाची शपथ वाहिली. ह्याप्रमाणें हा विलक्षण प्रकार बनून येऊन ह्मातान्या लाखा राण्याला हा विवाह करावा लागला. यावरून रजपुतांच्या स्त्रीविषयक समजुती आणि अभिमान कसे असतात हें स्पष्ट दिसतें. अस्तु.

वर लिहिल्याप्रमाणें लग्न झालें व त्या नववधूस मोकलजी हा मुलगा झाला. हा मुलगा पांच वर्षांचा असतां राजानें, गयेवर म्लेच्छलोकांनीं कांहीं गर्दी केली होती ती मोडण्यास जावयाचें ह्मणून, व आतां आपलें वयही वृद्ध झालें आहे, तेव्हां 'हें राज्यकारभाराचें जूं युवराज चोंडा याणें घ्यावें' ह्मणून त्याला सांगितलें; व 'मोकल हा तुझा धाकटा सावत्र भाऊ आहे तेव्हां त्यास तुला जें काय देणें योग्य वाटेल तें तूं दे', असें राजा ह्मणाला. त्यावर चोंडा याणें उत्तर दिलें, 'त्याविषयीं बोलणेंच नको. राज्याचा वारस मोकल असून त्याचा वांटा ह्मणजे चितोडचें सिंहासन हेंच आहे'. आणि तो आपल्या वचनप्रतिपालनाचा प्रामाणिकपणा विशेष व्यक्त करण्याकरितां बापास आणखी ह्मणाला कीं, 'आपण गयेस जाण्यापूर्वींच मो-

कल यास आपल्यादेखत राज्याभिषेक करून जावें ह्मणजे बरें. मी पाहिजे तर त्याची प्रधानगिरी करीन व माझा राज्यकारभारांत कांहीं जबाबदारीचा संबंध असावा असें वाटत असेल तर, माझ्या कट्यारीची खूण सर्व सरकारी कागदांवर होत जावी ह्मणजे झालें.' त्याचें तें ह्मणणें राजानें कबूल केलें व त्याप्रमाणें त्या लहान्या राजपुत्रास मोठ्या समारंभानें राज्याभिषेक झाला. त्या वेळीं पुनः चोंडा याणें, 'आपल्या या भावास राजा व अधिकारी या नात्यानें सर्व प्रकारचा मान देण्यांत मी कधींही कमीपणा समजणार नाहीं,' अशी शपथ घेतली.

चोंडा याणें स्त्रीविषयक गैरसमजुतीनें आपलें किती नुकसान केलें हें वरील सर्व हकीकतीवरून वाचकांस समजेलच. बाकी राजपदाला लागणाऱ्या अवश्यगुणांनीं तो युक्त होता यांत संशय नाहीं. तो शूर, युक्तिमान्, प्रामाणिक, मनमिळाऊ आणि रयतेला आवडता असा होता. राजपदधारी बंधु मोकल हा अज्ञान असल्यामुळें, कबूल केल्याप्रमाणें प्रधान या नात्यानें बापाचे पश्चात् तोच सर्व राज्यकारभार बिनबोभाट करीत असे. परंतु हा जो राज्यकारभार व सर्वप्रकारची देखरेख करीत असे, ती तशीच त्याणें करावी असें छोट्या राजाचे आईस बिलकुल आवडत नसे. ती त्या राजाची जननी असल्यामुळें तो अज्ञान असतां त्याचें पालन करण्याचा तिजकडे स्वाभाविकच अधिकार होता. परंतु तसाच अधिकार सर्व राज्यकारभार करण्यांतही असावा असें तिला वाटूं लागलें. तिला असें वाटे कीं, माझा मुलगा नांवाला मात्र राजा झाला आहे; बाकी सर्व राजसत्ता आणि राज्यसुख चोंडा हाच भोगीत असून, आपण राजमाता असतां आपल्याला तसा अधिकार आणि तसें सुख भोगण्यास मिळत नाहीं, हें बरोबर नाहीं. या महत्वाकांक्षेनें ती प्रधान चोंडा याचा

१. रजपूत लोकांमध्यें राज्याभिषेकाचे संबंधानें फार खर्च करण्याची रीति आहे. जगसिंगानें गादीवर बसण्याचे वेळेस ९० लाख रुपये खर्च केला होता अशी आख्या आहे. परंतु अलीकडे असे खर्च ते बेतानें करूं लागले आहेत. रूसदेशच्या बादशाहास नुक्ताच मॉस्को येथें राज्याभिषेक झाला त्या वेळीं तर कोट्यावधि रुपये त्या समारंभाकरितां उडाल्याचें प्रसिद्ध झालें आहे. तेव्हां वरील रजपुतांच्या त्या वेळच्या खर्चीचेंही कांहीं आश्चर्य नाहीं. जवळ पैसा असला अथवा पैसा येण्याला मार्ग असला ह्मणजे खर्च करण्याचीही तमा नसते. त्याप्रमाणें पूर्वीच्या लोकांजवळ पैसा विपुल असल्यामुळें ते खर्च करण्यास मागेपुढें बघत नसत. पूर्वीच्या इमारती आणि कामें बघितलीं व समारंभाचीं वर्णनें ऐकिलीं ह्मणजे त्यांणीं खर्चाविषयीं कोठेंच आणि कधींही कृपणपणा ठेविला नाहीं असें दिसेल. परंतु आतां मात्र लोकांजवळ पैसा नसल्यामुळें सर्वांनीं मितव्ययी व्हावें असा उपदेश करण्याचा काळ आला आहे! अस्तु. रजपूत लोकांचे राज्याभिषेकसमयीं राजपुरुषास भिल्लाच्या रक्ताचा टिळा लावावा असाही एक दस्तुर आहे, त्याप्रमाणें तो ते लावितात.

मनांतून व बाह्यवर्तनांतही द्वेष करूं लागली. राजमातेनें अशी कांहीं कुरकुर करावी अशा प्रकारचें चोंडा याणें पहिल्यापासूनच कधींही वर्तन ठेविलें नव्हतें व अशा प्रकारची तिची कुरकुर ऐकिल्यापासून तो बहुश: तिच्या संधानानेंच चालूं लागला. तथापि, तेवढ्यानेंही तिचें समाधान होईना. तेव्हां मात्र तो त्रासून चितोड येथील प्रधानकी सोडून मंडू संस्थानास गेला. तेथील राजानें त्याचा मोठा सत्कार करून त्यास ह्यालर नांवाचा एक परगणा जहागीर दिला.

चोंडा हा चितोड सोडून गेल्यानंतर मागें राणीच्या माहेरची मंडळी राज्यकारभारांत शिरली, तिचें माहेर ह्मणजे मारवाडांतील मंदोड हें असून तेथून तिचा जोधा नांवाचा भाऊ (हेंच नांव त्याणें पुढें जोधपुरास दिलें) व बाप रणमल्ल ही सर्व मंडळी मेवाडांत आली. मरुदेशासारख्या निर्जल व रूक्ष देशांत राहणारे मेवाडासारख्या सुपीक देशांत येऊन पडल्यावर राणीचे हे भाईबंद बरेच सुखावले. आजोबा राव रणमल्ल यांणीं नातवास मांडीवर घेऊन चितोडच्या सिंहासनावर खेळवीत बसावें, व जेथें बाप्पा रावळासारख्या पराक्रमी पुरुषावर छत्रचामरें ढाळत होतीं तेथें मंदोडचा रणमल्ल बसून तीं राजचिन्हें त्याजवर ढाळूं लागलीं. हें सर्वांशीं वाईट आहे असें सर्व ह्मणूं लागले. सिसोदिया कुळांतल्या दाया व चाकरमाणसेंही, हा होत असलेला प्रकार चांगला नाहीं असें प्रत्यक्ष राणीजवळ बोलत. पुढें पुढें राणीलाही, आपण चालू केलेला क्रम हितकर नव्हे व यांत आपले कल्याण नसून विनाकारण आपली नाचक्की मात्र होत आहे, असें वाटूं लागलें; व तिचें हें वाटणें दिवसेंदिवस जास्त जास्त दृढ होत चाललें. राव रणमल्ल हा फार लोभी असल्यामुळें लोभजन्य दुष्टबुद्धीनें तो पूर्णपणें भरला होता. चितोड येथून चोंडा तर निघून गेला व त्यानें कधींही अज्ञान राजाविषयीं किंवा त्याच्या मातेविषयीं कोणत्याही प्रकारची मत्सरबुद्धि ठेविली नाहीं. तसाच त्याचा रघुदेव ह्मणून एक भाऊ होता व त्याचेकडे केळवाडा व कोवारिया ही गावें होतीं. तो इतका सुस्वभावी, सद्गुणी, धैर्यवान्, रूपवान् आणि सर्वप्रिय होता कीं, त्याचा रणमल्लानें वध करविल्यावर त्याच्या मूर्ती करून मेवाडचे लोक त्याला देवासारखे पुजूं लागले. व त्याचें नांव पितृदेवांत घालून त्याचा ते नामोच्चार करूं लागले[1]! तो केळवाड्यास रा-

---

१. आश्विन शुद्ध १० (दसरा) व चैत्र शुद्ध १० या वर्षातल्या दोन दिवशीं, मेवाडांत रघुदेवाचें जें स्थान आहे तेथें मोठा उत्सव होतो. त्याच्या मूर्तीला उत्तम प्रकारचें स्नान घालून शृंगारितात. स्त्रिया आपली संतति आयुरारोग्यवान् व्हावी व पुरुष आपल्या स्त्रिया फलवती व्हाव्या ह्मणून त्याची प्रार्थना करितात. रघुदेवाच्या पूजेचा व उत्सवाचा प्रचार चालू होण्यापूर्वी बाप्पा रावळ याचा कुलेशपुत्र ह्मणून मुलगा असाच अपघाताने मेला होता त्याची पूजा आणि उत्सव होत

हत असून त्याचा चितोड संस्थानास कोणत्याही प्रकारचा उपद्रव नसतां, अज्ञान राजाचे आजोबा राव रणमल्ल यांनीं त्याला राजाचा भाई ह्मणून एक सन्मानाचा पोषाख पाठविला. आणि तो पोषाख तो बिचारा पेहरीत असतांच त्याला मारून टाकावें अशी गुप्त व घातुक व्यवस्था करून ठेविली होती, त्याप्रमाणें त्याला पोषाख घेऊन जाणारांनीं मारिलें !

वरील अनर्थाची बातमी राणीच्या कानांवर गेली तेव्हां तर तिचे सर्व विचार बदलून, चोंडासारख्या सत्पुत्राबद्दल वैषम्यभाव धरिल्याचें तिला फारच वाईट वाटलें. चोंडा गेल्यापासून राज्यांतल्या प्रत्येक मोठ्या व जबाबदारीच्या जागेवर तिच्या माहेरचे आप्त व स्वकीय नेमिल्यामुळें, तिला आपल्या बापाच्या व भावाच्या मताविरुद्ध कांहीं गोष्ट करावयाची ह्मणजे मोठी चोरी व अडचण झाली. खुद्द चितोड येथें चोंडाच्या रिकाम्या झालेल्या प्रधानकीच्या जागेवर जसलमीर येथील भाटी जातीचा एक रजपूत नेमिला होता. तो तरी तिच्या बापाच्या व भावाच्या शिफारशीचा आणि वळणाचाच असल्यामुळें, राणीला प्रसंगविशेषीं प्रधानाचें जें साह्य ह्मणून मिळावयाचें असतें त्याविषयीं तर तिची पूर्ण निराशा होती. बापाचा लोभी व दुष्ट स्वभाव तिनें पूर्णपणें ओळखिला होता व वरील रघुदेवाच्या अपघातानें तर तिची त्याच्या दुष्टपणाविषयीं पूर्ण खात्री झाली. तिला असाही संशय वाटूं लागला कीं, आपला दुष्ट व निर्दय बाप राज्यलोभानें एखादे दिवशीं आपल्या एकुलत्या एक राजपदधारी पुत्रासही ठार मारून आपण चितोडचा मालक होऊन बसेल. तेव्हां ह्या संकटास काय उपाय करावा या विचारांत ती गढून गेली.

चोंडा हा जरी चितोड सोडून गेला तरी तो चितोडच्या राज्यकारभाराची कशी काय व्यवस्था आहे ह्याविषयींची बातमी ठेवण्यास अगदीं उदासीन किंवा तिऱ्हाइतासारखा राहिला असें नाहीं. तो चितोडाहून गेला तेव्हां त्याचे खाजगत असे अहीरिया (शूर-पारधी) जातीचे दोनशें लोक त्याचे बरोबरच तो जिकडे जाईल तिकडे जाण्याकरितां निघाले. हे सर्व आपलीं कुटुंबें चितोडास ठेवून सडेच निघाले

---

असे. परंतु रघुदेवाचें स्थान झाल्यापासून कुलेशपुत्राची पूजाअर्चा आणि उत्सव मंद होत चालली. मेवाडांत रघुदेवाचें किंवा कुलेशपुत्राचेंच स्थान आहे असें नाहीं. तर तिकडे प्रत्येक रजपूत कुटुंबांत बहुतकरून असें एकेक 'पुत्र'स्थान आहे. ह्मणजे, जे जे राजपुत्र असे अपघातानें मारले गेले त्यांचीं त्यांचीं अशींच स्थानें झालीं आहेत. चावडा कुळांत वेणमाता नांवाची देवी, राठोड कुळांत नागनैचा नांवाची नागमूर्ति, आणि सिसोदिया कुळांत क्षेत्रपाळ वगैरे, अशीं कन्यापुत्रांचीं स्थानें रजपुतांच्या राजकुळांत असलेलीं प्रसिद्ध आहेत. वरील रघुदेवाचें पूजन चितोड येथील खुद्द राण्यापासून तों देवडीवरच्या चाकरापर्यंत सर्व लोक करितात !

होते. पुढें चोंडा हा मंडूच्या दरबारांत कायम झाल्यावर, ते लोक आपल्या कुटुंबीय माणसांस भेटण्याकरितां ह्मणून वारंवार चितोडास येत जात असत. त्यांच्याकडून चोंडानें चितोडची यथायावत् बातमी काढून नेत जावी व त्यांनाही ती सहज मिळे. आणि, चोंडाचे लोक तरी आपल्या कुटुंबांचे भेटीपेक्षां अशा बातम्या काढण्याकरितांच फारकरून वारंवार चितोडास जात. वरील रघुदेवाच्या घाताचें आणि त्यामुळें राणीचे पूर्वविचार दरोबस्त फिरल्याचें सर्व वर्तमान चोंडास समजलें. तेव्हां त्यानें आपल्या लोकांकडून तिच्या खात्रीच्या मसलतगारांमार्फत तिला असें सुचविलें कीं, 'तुह्मी राजास वनभोजनाच्या किंवा ईतर कांहीं निमित्तानें त्याच्या बड्या लवाजम्यानिशीं रोज किल्ल्यावरून खालीं आणीत जा, व हळूहळू त्या दुष्ट पितापुत्रांपासून तो जितका दूर राहील तितका राहू देण्याची व्यवस्था ठेवा; आणि होतां होतां दिवाळीच्या सणाकरितां राजेसाहेबांचा मुक्काम गोसुंदा येथें ठरवून तेथेंच मेजवानीचा बेत करा, ह्मणजे झालें.'

ह्या सर्व मसलतीचें धोरण तिच्या लक्ष्यांत येऊन तिनें तेव्हांपासून त्याप्रमाणें व्यवस्था ठेवण्यास सुरुवात केली. आपण असें कां करितें हें कोणाच्या लक्ष्यांत न यावें ह्मणून तिनें फार खबरदारी ठेविली होती व ती नेमलेल्या दिवाळीचे दिवसाची फार आतुरतेनें वाट पहात होती. तों तोही दिवस आला, आणि त्या दिवशीं ठरल्याप्रमाणें राजाचा मुक्काम तीन चार कोसांवर बदलून गोसुंदा येथें जेवण्याचा बेत झाला. गोसुंदा हें गांव चितोडापासून सुमारें चार कोसांवर दक्षिणेकडे माळव्याच्या रस्त्यावर आहे. दिवस संपून रात्र झाली. तरी चोंडा येतोसा दिसेना. जों जों रात्र होत चालली तों तों त्यांचा जीव चोंडा याचे मार्गाकडे लागला. इतक्यांत चाळीस घोडेस्वार घोडे फेंकीत फेंकीत यांच्या तळाशीं येऊन पोहोंचले. व पूर्वी ठरल्याप्रमाणें, गोटाचे दारावर 'चितोडी लोक आले आहेत' असे खुणेचे शब्द सांगितल्यावर राणीनें त्यांस गोटांत बोलाविलें. परंतु त्यांमध्यें चोंडा कोठेंच दिसेना, तेव्हां ती बुचकळ्यांत पडली. त्या लोकांत चोंडा होता; पण त्यानें आपला वेष त्या वेळीं मुद्दाम पालटला होता. राणीच्या जवळ पोंचल्यावर तो घोड्यावरून खालीं उतरला व आपल्या राज्यकर्त्या प्रिय कनिष्ठ बंधूस प्रेमानें व सन्मानपुरःसर भेटून आईलाही भेटला व तिचें सर्व प्रकारानें समाधान केलें. नंतर त्यांनीं सर्व तळ उठविण्यास सांगून चितोडास परतण्याचा हुकूम देवविला. तेव्हां त्या सर्व लवाजम्यासुद्धां राजा आणि त्याजबरोबर चोंडा व त्याचे लोक असे चितोडच्या रामपाल नांवाच्या महादरवाज्यापर्यंत बिनहरकत येऊन पोहोंचले. परंतु त्या महाद्वारावर, 'हे परकीय लोक कोण आहेत?' ह्मणून द्वारपालांनीं हटकिलें. तेव्हां चोंडानें

सांगितलें कीं, 'आह्मी शेजारचे संस्थानिक असून आज राजेसाहेबांचा मुक्काम गोसुंदा येथें झाला होता त्यांजबरोबरच आह्मीं भोजनें वगैरे आटोपिलीं; परंतु तेथून ते रात्रीच्या वेळींच इकडे येण्यास निघाल्यामुळें त्यांस सुरक्षितपणें किल्लयावर पोहोंचविण्याकरितां आह्मी त्यांजबरोबर आलों आहोंत.' चोंडाचें हें भाषण ऐकून त्याजबद्दल पहारेकऱ्यांनीं आभार मानिले व त्यांच्या थोरपणाची स्तुति करून त्यांस पुढें जाऊं दिलें. ते किल्लयावर जाऊन राजवाड्यांत पोहोंचतात तों चोंडाची टोळी पुढें होती; त्यांत चोंडानें आपली तरवार म्यानांतून काढल्याबरोबर सर्वांच्या तरवारी बाहेर निघाल्या. आणि प्रथमतः पहारेकऱ्यांचे तुकडे तुकडे उडवून भाटी जातीच्या दिवाणाचा चोंडा यानें शोध चालविला. तों तो, खालीं ही गडबड कशाची चालली आहे ती बघण्याकरितां रात्रीच्या वेळीं झोंपेंतून उठून बाहेर येऊन पाहतो तों, समोर चोंडा समशेर घेऊन उभा आहे असें त्यास आढळलें. तेव्हां त्यानें दुरूनच आपली कट्यार चोंडाचे अंगावर फेंकिली व त्यास जखमी केलें. परंतु चोंडाच्या लोकांनीं लागलेच त्यास तेथच्या तेथें ठार केलें. व तसाच पुढें कत्तल करीत करीत रणमल्लाच्या पक्षाचे जे राठोड तेथें सांपडले त्यांचाही त्यांनीं फडशा उडविला.

ह्याप्रमाणें अनिष्टपक्षाचे लोकांचा बराच संहार केला व तसाच राव रणमल्लाचाही अंत झाला. परंतु रणमल्लाचा शेवट चमत्कारिक रीतीनें झाला. तो असाः—रणमल्ल हा सिसोदिया घराण्यांतील एका कुणबिणीवर लुब्ध होऊन तिच्या नादीं लागला होता. ही कुणबीण राणीजवळच चाकरीस असून रणमल्लाच्या या हलकट कृत्यामुळें राणीकडून तिची नौकरी निघाली होती. ज्या दिवशीं ही कत्तल झाली त्या दिवशीं दिवाळीचा सण असल्यामुळें रणमल्ल हा दारू आणि अफू यांच्या सेवनानें धुंद होऊन विषयातुरतेनें त्या दासीसहवर्तमान तिच्या गळ्यांत हात टाकून पडला होता. बाहेर ठोकाठोकी आणि मारामारी चालली होती त्याची गडबड ऐकून तिनें त्याला सावध करण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न केला. परंतु व्यर्थ. मग तिनें हळूच त्याजपासून दूर होऊन, त्यानें हालचाल आणि गडबड करूं नये ह्मणून त्याच्या डोकीचें मारवाडी पागोटें काढून, त्यानें त्यास पलंगाला आवळून बांधून टाकिलें; व ती एकीकडे निघून गेली. मागाहून त्याचा कोणी हुजऱ्या आंतमध्यें घाबऱ्या घाबऱ्या जाऊन त्यास हांका मारितो तों पडल्या पडल्याच तो त्याजवर संतापून, 'मला त्रास देऊं नकोस' ह्मणून ह्मणाला. त्यावरून हुजऱ्या त्याजकडे गेलाच नाहीं. तों चोंडाचे लोक शोध करीत तेथें शिरले व त्यांनीं त्याचा शेवट करून त्याला त्याच दिवाणखान्यांत जमिनीवर लोळत टाकिलें. इकडे त्याचा मुलगा जोधा हा खालीं श-

हरांत होता. त्याला ही बातमी कळतांच तो परस्परेंच चितोडांतून लगबगीनें बाहेर पडला, आणि वाट सांपडेल तिकडे चालता झाला. ह्याप्रमाणें ह्या कपटी, घातुक आणि दुष्ट बुद्धीच्या मारवाडी लोकांस त्यांच्या कृत्याचें योग्य फळ मिळालें.

इतकें काम झालें. तथापि, चोंडाला आपल्या भावाचे घाताबद्दलचा अजून सूड उगविणें होताच. इतकी कत्तल झाली तरी तेवढ्यानें त्याचें समाधान झालें नाहीं: तो जोधा कोठें पळून गेला याचा तपास करूं लागला. परंतु जोधा आपल्या मंदोड राजधानीसही न जातां कोठें लपाला त्याचा त्यास पत्ता लागेना. तो मंदोड येथें शिरला तों तें शहर सर्व मोकळेंच होतें. जोधानें आपला जीव मात्र वांचविला; पण आपल्यामागें आपल्या कुटुंबाची व राज्यांतल्या प्रजेची काय दशा होईल याची कांहीं एक काळजी न बाळगतां व कोणत्याही प्रकारचा बंदोबस्त न करितां, तो तसाच कोठें दडून बसला होता. त्याचे दोघे मुलगे कुंतोजी आणि मुंजाजी हे दोघे मागाहून तगारी करून चोंडाबरोबर लढण्यास आले. परंतु चोंडानें त्या दोघांनाही चित करून ज्या राठोडांनीं सिसोदिया कुळाशीं कपट करून त्यांच्या राज्याचा बारा वर्षेंपर्यंत अव्याहत उपभोग घेतला होता, त्यांचा सव्याज सूड उगवून मंदोडचें राज्य त्यानें आपल्या ताब्यांत घेतलें आणि तेथें सर्व व्यवस्था केली.

"दुःखाचा परिणाम गोड होतो" अशी एक लोकांमध्यें ह्मण आहे. त्याप्रमाणें जोधा हा हे दुःखाचे दिवस जाऊन सुखाचे दिवस आपल्याला कधीं तरी येतील असें मानून होता. त्याला आपली राजधानी मंदोड ही तर पारखी झाली. तेव्हां त्यानें मंदोडचा नाद सोडून जोधपूर नांवाचें एक नवीनच शहर वसविलें. पुढें त्यानें हळूहळू सैन्य जमवून पुनरपि एकदां मंदोड घेण्याचा यत्न केला व तो सिद्धीस गेला. त्यामध्यें चोंडाचे दोघे मुलगे मंदोड येथें होते ते मारले गेले. ह्याप्रमाणें त्यानेंही चोंडाचा सूड उगविला. येणेंप्रमाणें मेवाड व मारवाड येथील राजांचें हें भांडण दिवसेंदिवस वाढतच चालल्यासारखें दिसूं लागलें. यानें त्याचा सूड उगवावयाचा आणि त्यानें याचा सूड उगवावयाचा, याप्रमाणें येथपर्यंत क्रम चालत आला. परंतु आतां यापुढें हा द्वेष आणि तंटा असाच राहूं देणें चांगलें नाहीं, असा जोधानें विचार करून चोंडाशीं तह करण्याचें बोलणें लाविलें. या बोलण्यांत जोधानें सांगितलें कीं, 'ज्या ठिकाणीं माझा मुलगा मुंजाजी पडला ती उभयराष्ट्रांची सरहद्द असावी,' व त्याप्रमाणें ठरून, राठोड आणि सिसोदिया या उभयकुलांचीं आपसांतलीं भांडणें तूर्त तर मिटल्यासारखीं झालीं.

अस्तु. मोकल हा पुढें वयांत आल्यावर, चोंडानें वि० सं० १४५४ ह्मणजे इ० स० १३९८ या वर्षी त्याचा त्याला राज्याधिकार अर्पण केला. परंतु हा राज्या-

धिकार त्याच्यानें फार दिवस भोगवला नाहीं. मोकल याच्या राज्याधिकारग्रहणाचें वर्ष ह्मणजे हिंदुस्थानच्या इतिहासांत दुसऱ्या एका मोठ्या गोष्टीविषयीं प्रसिद्ध आहे. तैमूरलंग नांवाचा मोंगल बादशाह मध्यएशियांत खुरासान व समरकंद इकडे आपलें राज्य स्थापून याच वर्षी हिंदुस्थानाकडे त्यानें आपला मोहरा फिरविला. इतक्यांत, दिल्लीच्या बादशाहाचा नातु मेवाडाकडे येत होता; त्याला मोकल हा रायपूर येथें आडवा होऊन त्यानें त्याचा पराभव केला. आणि तिकडून परत येत असतां त्याणें सांभरप्रांत घेतला. त्यामुळें त्याचेकडे तेथील मिठाचीं सरोवरें येऊन त्याला तो एक किफायतीचा मार्ग झाला. याचप्रमाणें मोकल यानें दुसरे अनेक पराक्रम करून आपली राज्यसीमा बरीच वाढविली आणि तिचा बंदोबस्तही उत्तम प्रकारें केला. कीं, पुढें तैमूरलंगाची स्वारी आलीच तर फारसें नुकसान न व्हावें व योग्य रीतीनें राज्याचें संरक्षण व्हावें. मोकल यानें, लाखा राण्यानें जो महाल बांधण्यास प्रारंभ केला असून त्याच्या स्थित्यंतरामुळें जो तसाच अर्धवट पडून राहिला होता, तो महाल पूर्ण केला. त्याचप्रमाणें त्यानें चितोडास पश्चिमेकडच्या उंचवट्यावर चतुर्भुजाचें एक सुंदर देऊळ बांधिलें. त्याच्या लहानपणीं मेवाड-मारवाडांतलीं द्वंद्वें चालून बरीच अस्वस्थता झाली होती ती, पुढें तो राज्याधिकार पाहूं लागल्यापासून नाहींशी झाली. मेवाडप्रांत शांतिसुखांत होता. त्याला तीन मुलगे आणि एक मुलगी अशीं चार अपत्यें होतीं. त्यांत मुलीच्या रूपाची तर फारच ख्याति होती. ती गाग्रोनच्या राजास दिली होती. अशा रीतीनें तो सुखानें प्राप्तैश्वर्याचा उपभोग घेत असतां एकाएकीं एके दिवशीं विनाकारण आपल्या चुलत्यांकडून मारला गेला. त्याची हकीकत अशी:—

१. ज्या प्रांतांत सांभरतलाव आहे त्यास सांभरप्रांत ह्मणतात. सांभरतलावांत मीठ पुष्कळ निघतें. त्याला सांभरी मीठ असें ह्मणतात. समुद्रापासून जे प्रांत दूर आहेत तेथील लोकांस ईश्वरानें याप्रमाणें मीठ पुरविलें आहे ! या तलावाची वहिवाट हल्लीं इंग्रजसरकाराकडे असून त्यांणीं आपल्या सोयीकरितां अजमीराहून तेथें आगगाडीचा रस्ता नेला आहे. जयपूर व जोधपूर येथील राजांचे या मिठाचे उत्पन्नांत हिस्से असून त्यांना त्याबद्दल दरसाल इंग्रजसरकार तीन लाख रुपये मक्त्याचे देतात ह्मणजे झालें. पंजाबांत कोहात पहाडाजवळ मिठाचे डोंगर आहेत. त्यांतच सैंधव सांपडतें. गुजराथेंत खारेंघोडें येथें विहिरींतून मीठ काढितात. त्यास वैडागरी मीठ ह्मणतात. वऱ्हाडांत लोणारचा तलाव ह्मणून आहे, त्यांतही असेच विपुल क्षार उत्पन्न होतात. समुद्रांतील मिठापेक्षां वरील स्थलचीं मिठें उत्तम असतात. आणि ह्मणून, गुजराथेंत मुंबईच्या समुद्रजन्य मिठास कच्चें मीठ ह्मणतात. असो. पण वरील क्षारोत्पत्तीचीं सर्व स्थलें समुद्रापासून फार दूर असून त्यांचा समुद्राशीं कांहींएक संबंध नसतां, त्यांत ईश्वरानें क्षारपदार्थांचा किती सांठा करून ठेविला आहे ! याविषयीं विचार करूं लागलें ह्मणजे या रत्नगर्भा पृथ्वीच्या उदरांत कोठें काय असेल याजविषयीं कांहीं तर्क होत नाहीं !

खेतसिंग (आजा) यानें एक सुंदर सुताराची कन्या उपपत्नी केली होती. तिचे पोटीं चचा व मेरा असे दोन पुत्र झाले. मेवाड येथील राजघराण्यांत चार पुत्रांच्या पुढें जर मुलगे असले तर त्यांना कांहींएक अधिकार किंवा सन्मान नसावयाचा असा ठराव असे. तथापि, ज्या अर्थी ते राजपुत्रच असत त्या अर्थी त्यांस ममतेनें वागवून त्यांचा चागल्या रीतीनें परामर्ष घेत. त्याप्रमाणें वरील दोघेजण राजघराण्यांत नुस्ते वाढले होते. तरी मोकल यानें, त्या दोघांकडे कांहीं सन्मानाचें काम असावें ह्मणून त्यांस आपल्या लष्करांत सातसातशें घोड्यांवर मुख्य नेमिलें होतें. त्यांना मोकल यानें जो अधिकार दिला हा रीतीच्या व ठरावाच्या बाहेर आहे असें समजून, मोकल याच्या दरबारांतले कित्येक लोक त्या दोघांचा कोणत्या तरी रीतीनें अपमान व्हावा असें इच्छीत होते. एके दिवशीं मोकल हा आपल्या दरबारी मंडळीसह एका उपवनांत बसला असतां तेथें असलेलें एक झाड कशाचें आहे ह्मणून त्यानें भोंवतालच्या मंडळीस विचारलें. तेव्हां त्यांत एक चव्हाण सरदार होता तो, 'आपल्यास कांहीं ठाऊक नाहीं' असें सांगून राजाचे कानाशीं लागला; आणि त्यानें त्याला हळूच सांगितलें कीं, 'हा प्रश्न आपल्या चुलत्यांस विचारा.' बरें, यावर मोकलानें तरी कांहीं दूरवर विचार करून, असें सांगण्यांत चव्हाणाचा कांहीं उद्देश असावा असा तर्क करावयाचा होता. पण तें त्याचें धोरण चुकून चव्हाण कानापासून दूर होतो आहे तोंच त्यानें त्या उभय चुलत्यांस प्रश्न करून विचारिलें, 'काका, कशाचें आहे हो हें झाड ?' यापेक्षां त्यानें त्यांस कांहीं एक विचारिलें नाहीं व त्याविषयीं तो जास्त कांहींच बोलला नाहीं. परंतु, त्यांना असें वाटलें कीं, आपला जन्म सुताराच्या मुलीचे पोटीं असल्यामुळें आपला अपमान करावा ह्मणूनच राजानें आपल्याला हा प्रश्न मुद्दाम केला असावा. असें मनांत आणून ते संतप्त झाले. आणि त्याच दिवशीं जेव्हां मोकल हा देवघरांत देवपूजन करून देवास गुलाबाच्या फुलांचा सहस्रनाम वहात होता तेव्हां, ते एकदम बुभुक्षित लांडग्यासारखे तेथें शिरले; आणि एकानें एका हिसक्यासरसा त्याचा हात उखळिला व दुसऱ्यानें पाठीमागून जाऊन त्याचें शिर उडविलें ! आणि असें हें दुष्ट कृत्य करून तेथून जे निघाले ते आपल्या घोड्यांवर बसून कोणीकडच्या कोणीकडे पळून गेले. हा सर्व अनर्थ एकाएकीं आणि निष्कारण ओढवल्यामुळें चितोडचे लोक साश्चर्य-दुःखांत बुडून गेले.

मोकल याचा असा परिणाम झालेला पाहून त्याचा मुलगा कुंभो राणा यानें मारेकऱ्यांस ताबडतोब पकडण्यासाठीं चितोडच्या वेशीचे दरवाजे बंद करण्याचा हुकूम दिला. परंतु ते घातुक राजद्रोही बंधु मदारिया नांवाच्या किल्ल्यांत जाऊन लपून

बसले. तेव्हां कुंभो यास असें वाटलें कीं, आपल्या बापाचे मामाकडून मारवाडांतून या कामांत तपास लावण्याविषयीं योग्य तें साह्य मिळेल व ज्या अर्थी जोधा याणें नुक्ताच चोंडा याजबरोबर तह केला होता त्या अर्थी पूर्वीचा द्वेष व मत्सरबुद्धि हीं त्याच्या मनांत नसतील, असें वाटून त्यानें त्याजकडे साह्य मागितलें. तेव्हां जोधा यानें आपला एक मुलगा व कांहीं सैन्य त्याजबरोबर दिलें आणि त्याचा पाठलाग करण्यास सांगितलें. परंतु तो सर्व कपटीभाव असल्यामुळें या मारवाडी साह्यानें त्याला कांहींएक नफा झाला नाहीं. कारण, सदर मारेकरी बंधु जोधा याच्या अगदीं सरहद्दीजवळ आसरा घेऊन राहिले असतां, जोधा याजकडून आलेल्या साह्यकारी लोकांनीं मुद्दाम तें स्थळ टाळून भलतीचकडे त्यांचा शोध चालविला; व त्यांना तेथूनही पळून जाण्यास संधि दिली. तेव्हां त्यांनीं मेरवाड्यांत राताकोट ह्मणून एक मजबूत किल्ला होता तेथें आसरा घेतला. त्यांनीं सुजा चव्हाण याची मुलगी पळवून नेली होती त्यामुळें तोही कुंभो यास या वेळीं मदतीला आला. परंतु त्यानें आपली मुलगी नेऊन अपमान केल्याची बातमी राजपुत्र कुंभो यास मुळींच कळविली नाहीं. ह्याप्रमाणें ते एकत्र झाल्यावर, सुजा यानें पूर्वीच त्या दुष्टांचें ठावठिकाण काढून ठेविलें होतें, तेथें जाण्याची सर्वांनीं तयारी केली. रात्रीची वेळ. अतिशय काळोख पडलेला. किल्ला ह्मणजे उदेपूरच्या भोंवतीं जी डोंगरसांखळी आहे तींत अगदीं मुळक्यावर व अत्युच्च ठिकाणीं असल्यामुळें, तेथें जाण्याला सीधा मार्ग नव्हता. वाटेनें डोंगरावरचें रान माजलेलें. रस्ता गैरमाहितीचा. अशा नानाप्रकारच्या संकटांतून या पाठलाग करणारांना जावयाचें होतें. परंतु करितात काय ? बापाच्या वधामुळें कुंभो राण्याला असा त्वेष आला होता कीं, ते दुष्ट कोठें सप्तपाताळांत जाऊन लपून बसले असते आणि ती त्यांच्या लपण्याची खरी जागा कोणीं त्यास सांगितली असती तरी, तो कशींही संकटें सोसून तेथें जाऊन त्यांचा सूड उगवून आला असता. त्याचप्रमाणें सुजाही अंतर्यामीं, त्यांनीं आपली कन्या पळवून नेल्यामुळें संतापून गेला होता. आणि मारवाडचा राठोडपुत्र ज्या अर्थी त्यांच्या साह्यास ह्मणून आला होता त्या अर्थी त्यालाही त्यांच्या बरोबर फिरणें प्राप्तच होतें. ही पाठलाग करणारी सर्व मंडळी रात्र पडेपर्यंत डोंगराच्या पायथ्याशीं देलवाडा या गांवीं जमून बसली. त्यांजमध्यें चंदाना ह्मणून एक रजपूत होता, तो वाट दाखविण्यास पुढें झाला. रात्र पडली तसे ते एकमेकांचे हात धरून चांचपडत चांचपडत परमावधीच्या संकटांनीं व त्रासांनीं अनेक प्रकारचीं वळणें, चढउतार, निबिड जंगलें आणि क्रूर पशूंचीं वसतिस्थानें यांमधून चालत जाऊन शेवटीं एकदांचे उजाडतें आहे तों किल्ल्यावर जाऊन पोहोंचले. वाटेनें त्यांना एक भयंकर

व्याघ्री भेटली. परंतु पुढच्या बाजूला सुजा चव्हाण चालला होता, त्यानें नेम धरून आपली बर्ची फेंकून मारिली; ती तिच्या काळजांतच जाऊन ती मरून पडली. ते डोंगराच्या शिखरावर जाऊन पोंहोंचतात तों, त्यांच्या बरोबर असलेल्या रणवाद्यांतील एक नगारा ज्याच्याजवळ होता त्याच्या हातांतून सुटून खालीं पडला आणि त्याचा मोठ्यानें आवाज होत होत तो कड्यावरून खालीं गेला. या आवाजानें वर किल्ल्यांत चचा याची मुलगी जागी होऊन ह्मणाली, 'बाबा, हा नगाऱ्याचा आवाज कोठून ऐकूं येतो ?' परंतु बाबाला आपला अंतकाळ समीप आला असून आपले अंतक संनिध आल्याची ही सूचना आहे, याची स्वप्नांत देखील कल्पना नव्हती. तो तिला ह्मणाला, 'ही मेघगर्जना होत आहे व आभाळ गडगडतें आहे. मुली, तूं स्वस्थपणें नीज. आपल्या शत्रूंस इतक्या उंच कधींही येववणार नाहीं. ते आपले खालीं स्वस्थ असतील.' तो असें मुलीचें समाधान करितो आहे तों मंदोडचा राठोड राजपुत्र व त्याचे मागून त्याचा पाठलाग करणारे शत्रु एकदम त्याचेपुढें जाऊन उभे राहिले. मग तो जातो कोठें ! चंदाना याची समशेर उघडीच होती, तिणें त्याचे लागलेच दोन तुकडे केले. ह्याप्रमाणें चचाचा अंत झाला आणि राठोड यानें मेरा यास त्याच्या पायाशींच ठार करून पाडिलें. याप्रमाणें मोकल याचा विनाकारण वध करणाऱ्या दोघां मारेकरी बंधूंस शासन करून कुंभो राण्यानें आपला पुत्रधर्म गाजविला. नंतर तो किल्ला, त्याजवरील लूट व त्याचे भोंवतालचा प्रदेश हीं सर्व या हल्ला करणारांनीं आपल्यामध्यें वांटून घेतलीं व सर्वजण खालीं उतरून आपआपल्या ठिकाणीं चालते झाले.

## भाग सहावा.

## कुंभो राणा.

कुंभोच्या वेळीं चितोडाची स्थिति.—मुसलमानी व हिंदुराजांच्या कारकीर्दीच्या मुदती.—कुंभो माळव्याच्या राजाचा पराभव करितो.—मेवाडांतील किल्ले.—कुंभोची कारकीर्द व त्याच्या हातचीं कामें.—त्याची पत्नी मीराबाई.—तिचा आणि त्याचा झालिनीच्या योगानें बेबनाव.—झालिनीमुळें मंदोडच्या राजाशीं कलह.—मीराबाईचा शेवट.—कुंभोचा अंत.—त्याचा मुलगा उदा किंवा उदयसिंग व त्याची कारकीर्द.—त्याचा विद्युत्पातानें शेवट.—रायमल्लाचें राज्यारोहण.— दिल्लीच्या बादशाहाची स्वारी व त्याचा पराजय.—खिलजीशीं लढाई व त्याचा पराभव.—रायमल्लाचे पुत्र.—त्यांचे आपसांत कलह.—संगाचा अज्ञातवास.—पृथ्वीराजाचा गृहत्याग व शौर्यदर्शन.—पृथ्वीराजा बापाकडे परत जातो.—जयमल्लाची हकीकत व त्याचा विषयीपणामुळें मृत्यु.—पृथ्वीराजानें व ताराबाईचें लग्न.—सुरजमल्लाचा उठाव.—रजपूत शत्रूंचें परस्परांशीं

वर्तन.—सुरजमल्ल व पृथ्वीराज.—बंडवाल्यांचा पराजय व पृथ्वीराजास यशप्राप्ति.—सुरजमल्ल मेवाड सोडतो व प्रतापगड देवळा हा प्रांत वसवितो.—पृथ्वीराजाचा व रायमल्लाचा शेवट.

आपला पिता मोकल याचा वध करणाऱ्या दुष्टांचा सूड उगविल्यानंतर कुंभो हा वि० सं० १४७५ ह्मणजे इ० स० १४१९ मध्यें चितोडच्या गादीवर बसला. तोही मोठा पराक्रमी होता. सुदैवानें, मेवाड प्रांतांत जे राजे झाले ते सर्व एकसारखे महापराक्रमी आणि शूर असेच निपजत गेले. असे शूर राजे कोणत्याही प्रांतांत झाले नाहींत. ह्या वेळीं ह्मटलें ह्मणजे मेवाड प्रांत हा आपल्या वैभवशिखरावर चढून जात असून त्या मार्गाच्या मध्यभागीं जाऊन पोहोंचला होता. अल्लाउद्दीनानें चितोडावर गर्दी केल्याला ह्या वेळीं सुमारें शंभर वर्षे होत आलीं होतीं. त्यामुळें चितोड येथील राज्यवैभव पूर्ववत् तेथील राज्यकर्त्याकडे येत चाललें असून तेथील मोडामोडी आणि पाडापाडी सर्व दुरुस्त झाली होती. मुसलमानांस अर्धी पादाक्रांत करून पूर्वी जे महावीर त्यांजबरोबर संग्राम करण्यांत बळी पडले त्यांचे जागीं नवेनवे वीर उत्पन्न होऊन मेवाडच्या राजशाहीस दिवसेंदिवस बळकटी येत चालली होती. उत्तरेकडून पुढें जीं विघ्नें व हल्ले येणार त्यांचें निवारण करण्याकरितां चितोड येथें सर्व प्रकारची सामग्री मिळवून तयारी करून ठेविली होती. व याबद्दलची व्यवस्था हमीर व लाखा राणा यांनीं अगोदरपासूनच चालविली होती, यामुळें पुढें जे रजपूत राणे चितोडच्या गादीवर आले त्यांस आपलें यश संभाळण्यास फार सोपें झालें होतें व तें यश पुढें कुंभोचा नातू संग राणा याजपर्यंत सारखें राहिलें होतें. पूर्वी सामरसी(समरसिंहा)चा ज्या ठिकाणीं पराजय झाला त्या सरस्वती नदीच्या तीरावर ह्या वेळीं रजपूत राजाचा 'किरमिजी झेंडा' झळकत होता.

प्रथमतः ज्या मुसलमानी बादशाहानें हिंदुस्थानचें सार्वभौमत्व मिळविलें तो शहाबुद्दीन गोरी व त्याचा समकालीन मेवाडचा राजा सामरसी यांचे नंतर दिल्लीस व चितोडास जे राज्यकर्ते झाले, त्यांचा इतिहास पाहिला तर, शहाबुद्दीनापासून हल्लींच्या काळापर्यंत दिल्ली येथें एकंदर २४ बादशाह आणि एक बादशाहीण असे मुसलमानी राजे झाले, आणि मेवाड येथें तितक्याच काळांत ११ राजे झाले. ह्याप्रमाणें पाहिलें असतां मुसलमानी बादशाहांपैकीं प्रत्येकानें सरासरी ९ वर्षे राज्य केलें व हिंदु राजांनीं प्रत्येकीं सरासरी २० वर्षे राज्यसुख भोगिलें. मुसलमानी बादशाह बहुतेक दग्यानें, दंग्यानें किंवा पदच्युत होऊन मेले आणि हिंदु राजे स्वराज्य व स्वधर्म रक्षणार्थ मेले व कोणी दग्यानें मारले गेले.

खिलजी वंशाचे अखेरीस दिल्लीचे सुभेदार स्वतंत्र होऊन, विजापूर, गोवळकोंडें, माळवा, गुजराथ, जोधपूर आणि काल्पी या ठिकाणीं त्यांनीं आपापलीं राज्यें स्था-

पिली. पैकीं माळवा आणि गुजराथ येथील सुभेदार राजे जबरदस्त असून त्यांनीं कुंभो राणा राज्यावर बसला तेव्हां मसलत करून आपल्या बलिष्ठ सैन्यासहवर्तमान वि० सं० १४९६ ह्मणजे इ० स० १४४० या वर्षी मेवाडावर स्वारी केली. त्यावेळीं कुंभो राणा हा आपली एकलक्ष फौज व चौदाशें हत्ती घेऊन माळव्याचे मैदानांत ह्मणजे त्याच्या मेवाडचे राज्याच्या सरहद्दीवर आला; आणि तेथें त्यानें त्यांचा पूर्णपणें पराभव करून माळव्याचा राजा माहमूद यास कैद करून चितोडास नेलें. पण पुढें सहा महिन्यांनीं कुंभोनें माहमुदास कांहींएक खंडणी वगैरे न घेतां सोडून दिलें इतकेंच नाहीं, तर त्याचा गोटा सन्मान करून त्याला त्याचे राज्यावर पुनरपि स्थापिलें. कुंभोच्या या उदार कृतीबद्दल मुसलमानी इतिहासलेखक अबू फजल हा आपल्या इतिहासांत त्याची फार प्रशंसा करितो. हिंदुराजांचें शौर्य, दातृत्व, औदार्य, अभिमान, सगर्विता आणि राजकारस्थानासंबंधीं भोळसरपणा या सर्वांचें मिश्रण झालेलें असून, त्यामुळें त्यांच्या आयुष्यक्रमांतील त्यांचा एकंदर व्यवहार मोठाच चमत्कारिक रीतीचा दृष्टीस पडतो! कुंभोनें माहमुदाचें राज्य त्यास परत दिलें, परंतु त्या वेळीं त्याचा मुकुट त्याला परत करणें राहिला होता तो कुंभोचा नातु संग राणा यानें बाबर यास परत दिला. कुंभो राण्याच्या वरील जयाचे संबंधानें चितोड येथें एक जयस्तंभ उभा केला आहे. त्याजवर असें लिहिलें आहे कीं, 'गुर्जरखंड व मालवदेश येथील फौजा एकत्र होऊन पृथ्वीला कंप आणण्यासारख्या व समुद्रतुल्य विस्तृत रीतीनें मेदपाट नगर (मेवाड) घेण्याकरितां आल्या होत्या. परंतु त्यांचा पराभव झाला.' वर लिहिलेल्या लढाईनंतर पुढें हिसार प्रांतांवर मेवाडची फौज गेली व तेथें त्यांनीं आपलें राज्य स्थापिलें. त्यावेळीं माळव्याच्या मुसलमानी राजाचीही फौज कुंभोच्या फौजेबरोबर साह्यार्थ होती व त्यावरून, माळव्याचा राजा आपले पूर्वीचे द्वेषभाव विसरून कृतज्ञतेनें मेवाडच्या राजाचा मित्र झाला होता असें दिसतें. याच फौजेनें पुढें दिल्लीचा सुलतान गोरी याचा पराभव केला. तरी दिल्ली येथें तैमूरलंगाच्या नांवानेंच लोक खुतवा पढत होते.

मेवाडचें संरक्षण उत्तम प्रकारें व्हावें ह्मणून एकंदर ८४ गड बांधलेले आहेत. त्यांपैकीं ३२ किल्ले तर एकट्या कुंभो राण्यानेंच बांधिले. त्यांमध्यें चितोडच्या खालोखाल कुंभोमेर ह्मणजे 'कुंभोचा डोंगर' ह्मणून किल्ला आहे. यास 'कुमळमेर किल्ला' असेंच ह्म-

---

१. मुसल्मानी व खिस्ती धर्मांतून व राष्ट्रांतून, प्रार्थनामंदिरें व ईश्वरभजनाच्या जागा यांत आपल्या राजाचें व त्याच्या कुटुंबाचें कल्याण व्हावें ह्मणून सर्व धर्मगुरु व प्रजाजन यांनीं प्रार्थना करावी असा संप्रदाय आहे. त्याप्रमाणेंच वरील तैमूर बादशाहाचे नांवानें खुदबा पढण्याचा (प्रार्थना करण्याचा) क्रम लोकांनीं ठेविला होता.

णतात. हा किल्ला इतका मजबूद आणि बंदोबस्ताचा आहे कीं, त्यावर एतद्देशीय शत्रूंचा कांहीं एक इलाज चालणार नाहीं. कुंभोमेर किंवा कुमळमेर हा किल्ला हल्लीं ज्या ठिकाणीं आहे त्या ठिकाणीं पूर्वी इसवी सनाच्या दुसऱ्या शतकांत संप्रति नांवाच्या एका जैन राजानें एक किल्ला बांधिला होता अशी हकीकत कळते. हा संप्रति राजा प्रसिद्ध चंद्रगुप्त राजाचा वंशज होता. कुमळमेर किल्ल्याच्या जागीं जैन लोकांचीं कांहीं देवळें अजूनही आहेत, त्यांवरून तेथील ताबा जैनांकडे होता असें सिद्ध होतें. कुंभोनें नागोर घेतलें तेव्हां तेथील दरवाजे व मारुतीची मूर्ति हीं जीं तेथून आणिलीं होतीं तीं या कुमळमेर किल्ल्यावर उपयोगास लाविलीं. त्यानें अबूवरही एक किल्ला बांधिला आहे. तेथें पूर्वी प्रमार राजानें एक किल्ला उभारिला होता व त्याच्याच आवारांत कुंभोनें हा दुसरा किल्ला बांधिला. आणि तेथें तो पुष्कळ वेळां वारंवार येऊन राहत असे. अबूच्या किल्ल्यावर कुंभोच्या व त्याचे बापाच्या पितळी मूर्ति ठेविल्या आहेत, व त्या मूर्तींस अजून देवासारखें मानितात. हे किल्ले बांधण्यास वगैरे कित्येक शतकें लोटलीं आहेत; तरी तेथील कांहीं स्थलें त्या वेळच्या स्थितीचें आणि वैभवाचें अजून स्मरण देतात! कुंभोनें पश्चिम सरहद्द आणि अबू यांच्यामध्यें नाकीं बांधिलीं व सिरोहीजवळ वासंती नांवाचा एक किल्ला बांधून, अरवली खोऱ्यांतल्या मैयर नांवाच्या रानटी लोकांचे प्रतिबंधार्थ मचीन नामक एक दुसरा किल्ला बांधिला. त्याचप्रमाणें त्यानें भूमिये (ह्मणजे, ज्यांस कांहीं जमीन मिळाली आहे) नांवाच्या दांडग्या व डोंगरी भील लोकांचे बंदोबस्ताकरितां आहोर आणि दुसरे कित्येक किल्ले बांधिले. त्यामुळें मेवाड व मारवाड यांची सरहद्द कोणती याविषयीं कोणास संशय न राहील अशी साहजिक सीमा आंखली गेली.

वरील राजकीय बंदोबस्ताखेरीज कुंभोनें आपल्या पूज्य धर्माच्या संबंधानेंही आपलें स्मारक करून ठेवण्यास कमी केलें नाहीं. त्यानें अबूवर कुंभोश्याम नांवाचें एक सुंदर देऊळ बांधिलें आहे. व त्याचप्रमाणें त्यानें ऋषभदेवाचें मंदीर ह्मणून

१. कुंभो राण्याचा प्रधान जो होता तो जैनधर्मी असून त्यानें आपल्या धर्मांचे लोकांकडून वर्गणी व पट्टी करून हें देऊळ उभारण्याचा विचार केला. आणि वर्गणीची यादी फिरविली तों कुंभो राण्यानेंच या सत्कृत्यास व कौशल्योत्तेजनास आठलक्ष रुपयांचा आंकडा टाकिला! ह्या देवळाचे पायथ्याचा दगड वरील जैन प्रधानानेंच इ० स० १४३८ त बसविला. हें देऊळ फार भव्य आहे असें वर सांगितलेंच आहे. त्याला तीन मजले असून त्याचे रक्षणार्थ भोंवतालीं सुमारें ३० हात उंचीचा कोट केलेला आहे. या देवळास मोठमोठे तळमजले(भुयारें)ही काढिले असून त्यांत अहमदाबादच्याप्रमाणें जैन साधूंचे सुंदर सुंदर पुतळे ठेविले आहेत. या देवालयावरून आणि पूर्वीच्या इतर शेंकडों कृत्यांवरून पूर्वी इकडे कलाकौशल्य कोणत्या स्थितींत होतें आणि पुढें तें कसें ऱ्हास पावत गेलें याचें उत्कृष्ट दर्शन होतें.

एक दुसरें विशाल देवालय बांधिलें आहे. या भव्य देवालयास दहालाख रुपयांवर खर्च झाला असावा. हें अबूवर मेवाडच्या पश्चिम बाजूकडील साद्री नांवाच्या उतरणीच्या मार्गावर बांधिलें आहे. हें देऊळ अगदीं एकांतीं व ओसाड प्रदेशांत असल्यामुळें तें मुसलमान शत्रूंस कधींही सांपडलें नाहीं आणि ह्मणून तें त्यांच्या दुष्क्रियेवांचून जसेंच्या तसेंच शाबूत राहिलें आहे. हल्लीं तरी हें देऊळ निर्मनुष्य आणि वनेचर श्वापदांचें आश्रयस्थान असेंच झालें आहे. कुंभो राणा जसा राजकीय व व्यावहारिक कामकारभारांत कुशल व निपुण होता, तसाच तो बुद्धिमान्ही होता. तो कविता सुंदर करी. त्यानें 'गीतगोविंद' या कृष्णविलासी काव्यावर उत्कृष्ट टीका केली आहे ह्मणून भाटांच्या ग्रंथांत वर्णन केलें आहे.

कुंभो राण्याची बायको ही मेरटच्या ठाकुराची कन्या असून ती त्या काळीं तिच्या सौंदर्यगुणशीलानें अत्यंत प्रसिद्ध होती. ती महाभक्त आणि कवयित्री असून तिणेंही श्रीकृष्णावर बहुत सुंदर व प्रेमल पद्यें केलीं आहेत. आतां हा कवित्वगुण तिला तिच्या पतीकडून मिळाला किंवा कुंभो राण्यालाच त्याच्या या राणीकडून मिळाला हें कांहीं सांगवत नाहीं. परंतु हीं उभयतां स्त्रीपुरुषें कृष्णभक्त होतीं असें त्यांच्या एकंदर कवितेच्या ओघावरून दिसतें. या शीलवतीचें नांव मीराबाई असून हें नांव मेवाड वगैरे प्रांतांत भक्तमालेमध्यें लोक गात असतात. मीराबाईविषयीं अनेक कथा व गोष्टी लोकांमध्यें प्रसिद्ध आहेत. त्यांतीलच ही पुढील गोष्ट येथें आह्मी देत आहों:—कुंभो राणा आपल्या संप्रदायाप्रमाणें आपल्या पराक्रमी सैन्यासहवर्तमान शत्रूचे मुलूख घेत असतां त्यांतच झालावाडच्या ठाकुराची कन्या त्यानें पळवून नेली. ही कन्या मंदोडच्या राठोडास देण्याचा तिचे बापाचा संकेत ठरला होता व मंदोडच्या राठोडानेंही ती परत मिळविण्याविषयीं बहुत प्रयत्न केला, परंतु ती त्यास मिळाली नाहीं. मंदोड व चितोड येथील राजघराण्यांत मातुलभागिनेयसंबंध (मामाभाच्यांचें नातें) होता. परंतु ह्या कृत्यानें त्यांचा पूर्वीचा कुटुंबकलह पुनरपि सुरू झाला. स्त्रीप्राप्तीची महत्वाकांक्षा व तिच्या अप्राप्तीमुळें होणारें अपमानजन्य दुःख हीं फार भयंकर आणि घातुक आहेत. कुंभोनें झालावाडची राजकन्या झालिनी इचें हरण करून जी नेली ती चितोडच्या अत्युच्च गडावर नेऊन ठेविली. 'या गडावरील झालिनीच्या दिवाणखान्यांत जी रोषनाई होई ती, भाद्रपदमासींच्या मेघच्छन्न अशा अंधाऱ्या रात्रीं मंदोड येथील राजाचे दिवाणखान्यांतून स्पष्ट दिसे व यामुळें तर राजाचा अगदीं संताप होऊन झालिनी ही कोणत्या उपायांनीं आपल्या हस्तगत होऊन झालेला अपमान भरून येईल, या गोष्टीकडे त्याचें नेहमीं लक्ष्य असे,' असें भाट आपल्या ग्रंथांत वर्णन करितात. आणि यामुळें

चितोडावर अनेक वेळां त्याचे हल्ले आले. परंतु त्यांत त्यास यश मिळालें नाहीं. मंदोडच्या राजाचा ह्याप्रमाणें मोठा अपमान केला हें कुंभोच्या एकंदर निर्मल राज्यकारभारास आणि त्याच्या सुगुणसंपन्नतेस मोठें लांछनावह होतें. मंदोडच्या राजानें, एकवेळीं अंधारांतून प्रचंड अटवीमधून रान तोडीत तोडीत एका अगदीं अप्रसिद्ध व अगम्य मार्गानें जाऊन चितोडास जेथें झालिनी ही राजकन्या राहत होती तेथपर्यंत प्रवेश केला. परंतु शेवटीं त्याचा बेत फसून त्याला हिर्मुष्ट होऊन मंदोडास परत जावें लागलें. असु.

याप्रमाणें कुंभोचें कृत्य त्याची परम सात्विक राणी मीराबाई इला न आवडून ती द्वारकेस जाऊन भगवद्भजनांत मग्न झाली व शेवटीं तेथेंच तिचा अंत झाला. द्वारकेस मीराबाईचें स्थान अजून आहे.

कुंभो राण्यानें सुमारें पन्नास वर्षें राज्य केलें. तो आपल्या सर्व शत्रूंवर विजयी झाला होता व त्यानें किल्ले कोट वगैरे बांधून आपल्या राज्यास मोठी बळकटी आणिली होती. त्याचप्रमाणें त्यानें देवळें वगैरे बांधूनही आपल्या राष्ट्रांतील कलाकौशल्याचें दर्शन करविलें. ह्याप्रमाणें तो वरील एका कन्याहरणाचे निंद्य कृत्याशिवाय निष्कलंक राजा असून मोठ्या उत्साहानें व वैभवानें आपल्या राजनिष्ठ प्रजेचें परिपालन करीत असतां एकाएकीं, वि० स० १५२५ ह्मणजे इ० स० १४६९ साली, त्याचा उदयसिंग नावाचा पुत्र होता त्याजकडून मारला गेला. व येथें कुंभो राण्याची कारकीर्द सपली.

उदयसिंग हा मुलगा विलक्षण महत्वाकांक्षी आणि अत्यंत उतावळा असा मनस्वी मनुष्य होता. त्याची महत्वाकांक्षा आणि उतावळेपणा ही, त्याच्या वरील अविचारी कृत्यावरूनच व्यक्त होत आहेत. बापाचे मागून आपल्याला गादीवर बसावयाचा हक्क असतां व वृद्ध पित्याकडून लवकर किंवा उशीरां केव्हां तरी राज्याधिकार व राज्यवैभव आपले हातीं यावयाचें असता त्यानें त्या प्रबळ महत्वाकांक्षेनें आणि उतावळेपणानें आपल्या जनकासच ठार मारून टाकिलें; यापेक्षां तो त्याचा अधमपणा आणि मौर्ख्य दुसरें कोणतें असावयाला पाहिजे होतें! परंतु त्याचा तरी काय परिणाम झाला? पितृघा-

---

१. जोधपूरचा राजा अभयसिंग याणें याजप्रमाणें पितृहत्या केली. राज्यलोभ हा मोठा दुर्निवार आहे. दक्षिणेकडे महाराष्ट्र देशाचे इतिहासांत पेशवेकुळांत अशा प्रकारचे अनर्थ झालेले दाखल आहेत. राघोबादादा यांणीं आपला पुतण्या नारायणराव पेशवा यास राज्यलोभानेंच मारिलें. परंतु ज्या सुखलाभाकरितां हे असले नीच मनाचे लोक अशीं नीच कर्में करितात तें सुख अंशतःही त्यांस न मिळतां इहपरलोकीं चिरकाळ दुष्कीर्ति आणि रौरववास यांशिवाय त्यांना काय मिळावें! व त्याप्रमाणें त्यांस तीं फळे मिळालेलीं सर्वांस मशहूर आहेतच.

तकी राजपुत्र आपला राजा होणें कोणास आवडेल ? त्याचें हें नीच कृत्य बघून सर्व लोक त्याविषयीं नाखुष आणि बेमुर्वत झाले. ते त्याला 'हत्यारी' (मारेकरी) अशा निंदाव्यंजक विशेषणानें हांक मारीत. पुढें तो तरी इतका मूर्ख व अजागळ निघाला कीं, त्याच्या पांच वर्षांच्या कारकीर्दीत अनेक असंतोषाचीं कृत्यें घडलीं. मागील राजांनीं जे प्रांत मोठ्या प्रयत्नांनीं मिळविले होते त्यांचें त्याजकडून बरोबर संरक्षण होईनासें होऊन ते त्याजकडून हळूहळू जात चालले. त्याणें देवरा ठाकूर यास अबू प्रांत देऊन त्यास स्वतंत्र केलें. आणि त्याचप्रमाणें जोधपूरच्या राजास सांभर व अजमीर देऊन त्याची त्याणें मैत्री संपादण्याचा क्रम चालविला. परंतु चमत्कार हा कीं, ज्यांच्या मैत्रीकरितां त्याणें त्यांस वरील प्रांत दिले, त्यांजकडून त्याला कोणत्याही प्रकारचा मोठेपणा अथवा कृतज्ञता दाखविण्यांत आली नाहीं. शेवटीं तो दिल्लीच्या बादशाहांस शरण जाऊन त्याला आपली मुलगीही देण्यास तयार झाला होता. परंतु, मुसलमानी घरांत आपल्या मुली देण्याचें लांछनास्पद कृत्य बाप्पा रावळाचे वंशांत जें आजपर्यंत कधींच झालें नव्हतें तें घडविण्याचा ईश्वरी संकेतही नसल्यामुळें ती गोष्ट घडून आली नाहीं. ह्मणजे, वरील कन्यादानाचा विचार ठरवून बादशाहाची रजा घेऊन तो त्याच्या दिवाणखान्यांतून बाहेर पडतो तों एकदम प्रचंड विजेचा त्याजवर आघात होऊन तो तावडतोड तेथेंच मरण पावला. ह्याप्रमाणें सिसोदिया कुळाचें पावित्र्य आणि अभिमान हीं ईश्वरानेंच राखिलीं, असें भाट ह्मणतात. या 'हत्यारी' उदयसिंगाचें वर्णन भाट लोकांनीं सर्व प्रकारच्या निंदा व शाप यांनीं भरून केलें आहे.

उदाचा (उदयसिंगाचा) याप्रमाणें अंत झाल्यावर त्याचा भाऊ रायमल्ल नांवाचा होता तो वि० सं० १५३० ह्मणजे इ० स० १४७४ मध्यें चितोडास मेवाडचा राजा ह्मणून गादीवर बसला. उदा हा जो दिल्लीस तेथील बादशाहाला शरण गेला होता ह्मणून वर सांगितलें तो, त्याचा हा भाऊ त्याजबरोबर लढत असून त्यांत त्याचा पराभव झाल्यामुळें दिल्लीवाल्यांकडून तरी मदत मिळेल ह्मणून त्यास शरण गेला व त्यास आपली मुलगी देण्याचें कबूल करून बाहेर येतो तों वर लिहिल्याप्रमाणें अपघातानें त्याचा शेवट झाला. तेव्हां अर्थात् त्याचे मागून त्याशीं लढणाऱ्या या रायमल्लालाच मेवाडचें राज्य मिळालें. परंतु उदयसिंगाला सहस्रमल्ल व सुरजमल्ल या नांवाचे दोन पुत्र असून त्यांचा गादीवर वारसा असतां ते मागें पडले. तेव्हां ते दिल्लीचे बादशाहाची मदत घेऊन मेवाडावर आले व त्यांणीं नाथद्वारास तळ दिला. परंतु लोकांचा व इतर संस्थानिकांचा पहिल्यापासूनच रायमल्लाकडचा पक्ष असल्यामुळें सर्व प्रकारची मदत रायमल्लासच मिळाली. अबू व गिरनार येथील

ठाकूर व दुसरे सर्व राजे रायमल्लाकडेच झाले तेव्हां त्यांची एकंदर साठहजार फौज जमली. नंतर त्या उभयपक्षांची नाथद्वाराजवळच घासा या ठिकाणीं लढाई झाली. ती फारच भयंकर झाली. भाटांनीं तर असें वर्णन केलें आहे कीं, या लढाईंत रक्ताचे पूर वाहिले! कारण, वरील दोघे बंधु सिंहासारखे शूर आणि पराक्रमी असल्यामुळें रायमल्लाकडील लोकांचा फार संहार केला. परंतु त्यांजकडे सर्व प्रकारानें उत्कृष्ट मदत असल्यामुळें दिल्लीवाल्यांचा आणि त्या सिंहासारख्या पितृहत्यारीपुत्रांचा सर्वांशीं मोड होऊन त्यांस दिल्लीकडे परत जावें लागलें.

रायमल्लानें आपली एक मुलगी गिरनारचा ठाकूर सुरजी यादव यास दिली होती व दुसरी सिरोहीची ठाकूर जयमल्ल देवरा यास देऊन तिला अबूचा प्रांत आंदण दिला होता. वर लिहिलेल्या लढाईंत रायमल्लाचे दोघां पुतण्यांचा पराभव झाल्यावर ते पुनः त्याजकडे आले व त्यांस त्याणें क्षमा करून त्यांच्या डौलाप्रमाणें त्यांस नेमणूक करून देऊन त्यांना आपल्याजवळ बाळगिलें होतें. पुढे माळव्याचा सुलतान घियामुद्दीन खिलजी याचा व रायमल्लाचा कांहीं तंटा होऊन त्यांजमध्यें मोठी लढाई झाली. तींत हे दोघे शूर पुतण्ये त्याच्या फार उपयोगीं पडले व खिलजीचा सर्वांशीं पराभव झाला.

रायमल्लाला संग, पृथ्वीराज आणि जयमल्ल असे तीन पुत्र होते. यांत संग व पृथ्वीराज हे सहोदर (सख्खे भाऊ) असून ते झालावाडचे ठाकुराच्या कन्येचे पुत्र होते; व तिसरा जयमल्ल हा दुसऱ्या राणीचा मुलगा होता. संगाचें सगळें नांव संग्रामसिंग असें होतें; त्याचें थोडक्यांत संग असें नांव पडलें असून तो बाबराचा प्रतिस्पर्धी होता. हे तिघेही भाऊ लहानपणापासून एकमेकांशीं फार भांडत असत. तिघेही मोठे शूर आणि पराक्रमी असून त्यांच्यांमध्यें द्वैधीभाव नसता तर रायमल्लाच्या पूर्वजांनीं जितका मुलुख काबीज करून लौकिक संपादिला तितका मुलूख व लौकिक या मुलांनीं मिळविला असता. परंतु तें व्हावें कसें? पुढें, संग हा थोरपणाच्या बुद्धीप्रमाणें आपणच दूर निघून गेला होता व दुसऱ्या दोघांस त्यांच्या भांडणांमुळें त्रासून बापानेंच बाहेर घालविलें होतें. त्यांत जयमल्ल हा पुढें त्याच्या अव्यवस्थितपणानें एका प्रसंगांत मारला गेला. वरील तिघेही राजपुत्र रजपुतांच्या इतिहासांत फार प्रसिद्ध असून त्यांच्या विषयींच्या हकीकती फारच विलक्षण आहेत. त्यांवरून, रजपूत कुळांतील लोकांस जेव्हां शत्रूंबरोबर युद्धसंग्रामाच्या कामगिऱ्या नसतात तेव्हां त्यांचे काय काय उद्योग चालू असतात हें समजतें.

वरील तीन पुत्रांचे तीन प्रकारचे स्वभाव होते. एके दिवशीं हे तिघे बंधु व त्यांचा चुलत भाऊ सुरजमल्ल असे चौघेजण शिकारीहून आल्यावर रीतीप्रमाणें वा-

ज्याच्या गच्चीवर सत्रंजी पसरून हवाशीर जागेत पानसुपारी खात व कोणी कुसुंबा पीत बसले होते. तेथें गोष्टी निघतां निघतां संग ह्मणाला, 'मी जरी मेवाडच्या गादीचा वारस आहें, तरी देवीच्या देवळांत जाऊन, तिच्या इच्छेनें मेवाडच्या गादीवर कोणीं बसावें याविषयीं कौल मागूं.' त्याप्रमाणें ते चौघेही उदेपुरापासून दहा कोसांवर त्यांच्या चारणी देवीचे देवळांत गेले. पहिल्यानें पृथ्वीराज आणि सुरजमल्ल हे देवळांत शिरून तेथें भुईवरच बसले. नंतर संग जाऊन, तेथें देवीचा कौल देणाऱ्या भक्तिणीचें व्याघ्रांबर अंथरलें होतें त्यावर बसला व त्याचेच शेजारीं सुरजमल्ल आपली एक मांडी ठेवून बसला. नंतर पृथ्वीराजानें त्या भक्तिणीला आपला हेतु कळवून 'मेवाडच्या गादीवर आह्मांपैकीं कोणी बसावें?' याविषयीं कौल मागितला. तों तिणें व्याघ्रांबरावर जो बसला होता त्याजकडे बोट दाखविलें, व 'त्याचे शेजारीं बसणाराही राज्याचा कांहीं भाग पावेल' असें भविष्य सांगितलें. हें भविष्य ऐकिल्याबरोबर पृथ्वीराजानें संतापून संगावर तरवार उपसली आणि 'त्या भविष्यवादिनीचें भाकित खोटें करितों' असें ह्मटलें. परंतु सुरजमल्लानें त्याचा हात धरिल्यामुळें संग बचावला व भविष्यवादिनी त्याचें तें भयंकर स्वरूप बघून तेथून पळून गेली. तरी त्या झटापटींत सुरजमल्ल व पृथ्वीराज हे परस्पर बरेच घायाळ होऊन संगालाही तरवारीचे पांच चार वार सोसावे लागले. व त्याप्रमाणेंच एक बाण त्याचे डोळ्यास लागला तो डोळा फुटून तो जन्माचा एक डोळ्यानें अंधळा झाला. शेवटीं त्याणें तेथून निघून जाऊन आपला जीव वांचविला. संग निघाला तो बीडा उदावत याचे घरीं जाऊन लपून राहिला. तो त्याचा सावत्र भाऊ जयमल्ल, जो देवीचे देवळांत पृथ्वीराजाबरोबरच जमीनीवर बसला होता, तो त्याचा पाठलाग करीत घोडा दवडीत बीडाचे घरीं आला. तेव्हां बीडानें त्यास सांगितलें कीं, 'संगाला मी आपल्या पाठीशीं घातलें आहे, त्या अर्थी तो तुझ्या हातीं लागणार नाहीं.' इतकें बोलणें ऐकिल्याबरोबर जयमल्लानें तरवार उपसून बीडालाच ठार केलें. त्या झटापटींत संग तेथून निघून गेला आणि पुष्कळ दिवस लपत फिरत होता.

इकडे पृथ्वीराज जो घायाळ होऊन आजारी पडला होता तो बरा झाला आणि संगाचा तपास करूं लागला. परंतु संग, जो पुढें तैमूरवंशीय बाबर या शूर पुरुषाबरोबर एकलक्ष फौजेनिशीं सारखा झुंजूं लागला, तो वेषांतर करून एका धनगराचे घरीं त्याच्या मेंढ्या वळीत राहिला होता ! तें काम करण्याचा त्या बिचाऱ्यास कधींच सहवास नसल्यामुळें त्याचा यजमान धनगर त्यास नेहमीं, 'तुला जेवतां येतें, पण मेंढरें वळतां येत नाहींत' असें ह्मणून त्रास देत असे. पण, त्याचा हा अज्ञातवास फार दिवस राहिला नाहीं. त्याणें अशा स्थितींत असतांच आसपासच्या

कित्येक राजांचा परिचय करून ठेविला. व त्यांतच त्याच्या एका स्नेही राजानें एक घोडा व कांहीं मुख्य हत्यारें अशीं त्यास दिलीं. तीं मिळाल्यावर संगानें ती मेंढपाळाची चाकरी सोडून देऊन शूर सरदाराच्या वेषानें तो कोठें तरी आश्रय शोधण्यास निघाला. तो, अजमीराजवळ श्रीनगर ह्मणून संस्थान असून तेथील राजा प्रमारवंशीय राव कर्मचंद्र (करमचंद) नांवाचा होता, त्याजवळ चाकरीस राहिला. या रावाजवळ तो असतां एका अघटित गोष्टीवरून त्या रावानें आपली कन्या त्याला दिली. ही गोष्ट भाटांनीं अशी लिहिली आहे:—एके दिवशीं संग हा आपले दोन विश्वासू रजपूत शिपाई बरोबर घेऊन शिकारीला गेला होता. तेथें तो एका ठिकाणीं मुक्कामास उतरून त्याचे चाकर भोजनाचे तयारीस लागले होते. संग एका झाडाखालीं गाशा टाकून व बरची उशाला घेऊन निवांत झोप घेत पडला होता व त्या वेळीं त्या झाडाच्या पानांतून सूर्याचें किरण त्याचे तोंडावर पडलें होतें. अशा वेळीं एक नाग येऊन त्याणें त्याचे डोक्यावर फणा उभारिली व त्याचे तोंडावर छाया धरिली. नंतर देवी नांवाचा एक कल्याणसूचक पक्षी त्या नागफणीवर बसून कांहीं चिवचिव करीत होता. इतक्यांत त्याच रस्त्यानें मरू नांवाचा एक धनगर आपल्या मेंढ्या हांकीत चालला होता. त्याणें हा सर्व चमत्कार बघितला. त्याला पक्ष्यांची भाषा समजत होती. त्याणें या सर्व चिन्हांवरून व त्या पक्ष्याच्या बोलण्यावरून असें जाणिलें कीं, 'हा मनुष्य (संग) पुढें छत्रधारी (राजा) होणार.' व ही गोष्ट पुढें त्याणें राव प्रमारासही कळविली. धनगर मेंढरें हांकीत चालला असतां त्या गडबडीनें संगही जागा होऊन उठून बसला व त्यालाही त्याणें तें भावी वैभवाचें भाकीत सांगितलें. पुढें राव प्रमारानें, संग हा राजछत्रधारी होणार हें जाणून त्यास, वर लिहिल्याप्रमाणें, आपली कन्या देऊन जांवई केलें.

इकडे राणा रायमल्ल यास, आपल्या युवराजाची (संगाची) काय वासलात झाली हें समजत नाहीं व याला पृथ्वीराजाचा दुष्टावाच कारण झाला असें पाहून, त्यास पृथ्वीराजाविषयीं अत्यंत अप्रीति उत्पन्न झाली. त्याणें त्याला सांगितलें कीं, 'तूं येथून निघून जा व आपल्या शौर्यावरच कमाई करून पोट भर.' त्याप्रमाणें तो राजपुत्र पांच घोडेस्वारांनिशीं बापाला नमस्कार करून निघाला. तो गोदवाड प्रांतांत आला व त्याचें मुख्य शहर नांदोल येथें त्याणें मुक्काम केला. कोठें नौकरी चाकरी मिळेपर्यंत त्याला जवळच्या जिनसा मोडूनच निर्वाह करणें प्राप्त होतें. त्याप्रमाणें त्याणें एके दिवशीं तेथील ओझा नांवाच्या एका वाण्यास आपली अंगठी विकून सामान खरेदी केलें. तो वाणी मोठा धूर्त आणि राजकारस्थानी होता. ती